# श्रीचक्रधरसिद्धान्तसूत्रें

## भाग पहिला.

### लक्षणान्वयसूत्रपाठ.

नीळकंठ बळवंत भवाळकर, बी. ए., बी. एल्.
हरी नारायण नेने, एम्. ए., एल्. टी.

१९३१



किंमत दीड रुपया.

# अनुक्रमणिका



# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | ओळ | शुद्ध |
| --- | --- | --- |
| ११ | ५ | सुचा |
| ११ | १४ | ब्रम्हादिक |
| १३ | ११ | ज्ञानिया |
| १४ | ३ | संपूर्ण |
| ४२ | २४ | जीवसृष्टिप्रपंच |
| ६५ | १४ | स्वरूपाचेनि |
| ७८ | ४ | आकारे |
| ८२ | १८ | विश्ववेऱ्हीं |
| ८५ | १७ | परमेश्वर |
| ८९ | ३ | मेळवीति |
| ८९ | ५ | खड्ग |
| ९० | १६ | धर्म । या तीं |
| ९३ | २२ | चर्या |
| ९४ | १ | वोलेय। |

# संदर्भग्रंथ.

(१) श्रीमूर्तिज्ञान (२) आचारपाठ–महाभाष्य (३) अन्यव्यावृत्ति सरवळे (४) चतुर्वर्गचिंतामणि (५) नामाचें व्याख्यान (६) निर्वचनप्रमेय (७) दृष्टांतलापणिका (८) पूर्वीपट (९) पंचवार्तिक (१०) प्रकरणवश (११) लक्षणरत्नाकर (१२) लक्षणबंध (१३) लीलाचरित्र–उत्तरार्ध (१४) महावाक्यप्रमेय (१५) वच्छहरण (१६) शिशुपालवध (१७) संसरणप्रमेय (१८) ब्रम्हविद्याशास्त्र ( सूत्रांची संस्कृत छाया ) (१९) स्थळ ( भाष्य ) पोथी (२०) स्मृतिस्थळ (२१) सिद्धहैमचंद्र.

[ **टीप**:—आचार–विचारपाठ, माला, शोधनी, दृष्टांत, लापिका वगैरे उतारे व त्यांचे निर्देशक आंकडे सोलापूर प्रतीवरून दिले आहेत.]

# प्रस्तावना.



महानुभावीय वाङ्मय शारदोपासकांच्या दृष्टीस पडण्यास व तिकडे त्यांचें लक्ष्य वेधण्यास १९०७ सालीं जळगांव खानदेश कोर्टीत विष्णुबोवा जोगांवर जो फौजदारी खटला झाला त्याचें निमित्त झालें नसते तर अजून देखील त्या पंथाच्या लोकांस आपलें वाङ्मय प्रकट करण्याची बुद्धि कदाचित मुळींच झाली नसती. त्यांचे कांहीं धार्मिक वाङ्मय यापूर्वी लाहोर, सोलापूर, खामगांव, पुणें वगैरे ठिकाणीं छापून प्रसिद्ध झालें होतें; परंतु तिकडें तत्कालीन सारस्वतोपासकांचें लक्ष्य गेलें नव्हतें. पुढें आपल्या पक्षाच्या समर्थनासाठीं महानुभावीयांस डॉ. भांडारकरांचा आश्रय घ्यावा लागला व त्यांच्या पंथाबद्दलच्या रूढ असलेल्या मिथ्या कल्पना सरकारी ग्रंथांतून हळू हळू दुरुस्त झाल्या. या वादविवादाच्या भरांत पक्षाभिमान बळावून कांहीं वेळ खरे संशोधन झालें नाहीं; पण रा. भावे यांच्या परिश्रमाने १९२४ मध्ये त्या गुप्त अशा वाङ्मयाची ओळख होऊन त्यांतील काव्यामृताचे कांहीं तीर्थ रा. भावे व देशपांडे यांच्या प्रयत्नानें सर्वांस आस्वादण्यास मिळाले आहे. परंतु महानुभावीय धार्मिक ग्रंथांचा विशेष निकट परिचय मात्र आजपर्यंत झाला नव्हता; तो करून देण्याची संधी मिळाल्याबद्दल आम्हीं परमेश्वराचे आभारी आहोंत. हा प्रयत्न १९२९ सालीं नागपूरस्थ विरक्तकपाटेश्वर महानुभावांचा परिचय झाल्यामुळें केला गेला व प्रस्तुत ग्रंथ हा त्यांच्याच प्रोत्साहनाचें पहिलें गोड अमृतफळ आहे.

या वाङ्मयाचा प्रारंभ कन्हरदेव आणि रामदेवराय जाधव यांच्या कारकीर्दीत झाला. या दोन्हीं राजांच्या कारकीर्दीत विद्वानांचा चांगला परामर्ष घेतला जात असे व तो काळ जसा यादव घराण्याच्या भाग्योत्कर्षाचा होता तसाच तो मराठी वाङ्मयाचा उदङ्गमुख असा सारस्वतकालही होता, व चक्रधराच्या शिष्यवर्गांचे कित्येक सुंदर काव्यग्रंथ ज्या काळांत ज्ञानेश्वरी प्रगटली त्याच काळांत झाले. परंतु त्या काळांतील गद्य ग्रंथांचा परिस्फोट अजून

झाला नव्हता; आणि तत्कालीन महाराष्ट्रीय गद्याचें स्वरूप कसें होतें तें स्पष्ट समजण्याचीं साधनें प्रसिद्ध झालीं नव्हतीं. आमचीं सूत्रें ज्ञानेश्वरपूर्वकाळांतील आणि गद्यमय असल्यामुळें त्यांचे महत्व जितकें तत्वविचारविमर्षकास आहे तितकेंच तें मराठी भाषेची पूर्वपीठिका शोधणाऱ्या व उगमस्थानाचें स्वरूप जाणण्यास उत्सुक असणाऱ्या भाषाशास्त्रज्ञासही आहे. हीच दृष्टि मुख्यत्वें करून ध्यानांत ठेवून आम्हीं या प्रयत्नास हात घातला आहे.

चक्रधराच्या चरित्राची रूपरेखा, त्यांतील ऐतिहासिक भागांचें प्रत्यंतर पुराव्याच्या आधारानें संशोधन आणि कालनिर्णयाची निश्चिती याबद्दल आज आम्हांस मुग्धता धरावी लागत आहे. चरित्राचे आधारभूत मूळ ग्रंथ अजून प्रसिद्ध झाले नाहींत; त्यांचे काल व नामसादृश्यामुळे कित्येकदां कर्तृत्वही संशयित भासतात;आणि जोंपर्यंत उपलब्ध ग्रंथाचे काळजीपूर्वक समग्र वाचन होऊन त्याबद्दल निर्णायक व स्वप्रत्ययप्राप्त अशी खात्रीची माहिती मिळत नाही तोंपर्यंत आम्हांस त्यांच्या सत्यासत्यतेबद्दल चर्चा करणे इष्ट वाटत नाहीं. आज सहासातशे वर्षें प्रगट असलेल्या मराठी वाङ्मयांतच इतकीं वादस्थळें व संदेहस्थानें आहेत कीं, या आजपर्यंत अत्यंत गुप्तपणे दडून असलेल्या महानुभावीय वाङ्मयाच्या कालाबद्दल अगर कर्तृत्वाबद्दल साशंकवृत्ति झाल्यास गैरवाजवी म्हणतां येणार नाहीं. रा. भावे व देशपांडे यांनीं उद्धृत केलेले सर्व ग्रंथ त्यांनीं स्वतः आमूलाग्र वाचले नसावेत; आणि त्याविषयीं त्यांनीं दिलेली माहिती फक्त सांगीव व सांप्रदायिक असणार हे उघड आहे. त्यांनी आपल्या कालनिर्णयाचे आधार प्रायः दिले नाहीत. तशांत त्या पंथांतील महंतांतच त्याबद्दल मतभेद असण्याचा संभव नुकत्याच मुकुंदराज आराध्य यांनीं प्रसिद्ध केलेल्या हिंदी चक्रधर चरित्राच्या भूमिकेवरून निर्दिष्ट होत आहे; म्हणून साधनांच्या उपलब्धीच्या आजच्या अडचणी ध्यानांत घेऊन आम्हीं भाव्यांचे व देशपांड्यांचें कालनिर्देश स्थूलतः आमचे मतस्वातंत्र्य कायम राखून स्वीकारले आहेत; ते प्रमाणभूत मानण्याची आज आमची तयारी नाहीं. रा. पाध्ये यांनीं हेमाद्रीवर नुकताच जो नवा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे त्यांतही वरील ग्रंथकारांचीं मतें व कालनिर्णय स्वीकारल्यामुळें कांहीं संदेह निर्माण झाले आहेत. हल्लींच्या

वाङ्मय संशोधकांनीं, विशेषतः महानुभावीय वाङ्मयाच्या अज्ञातकल्प प्रासादांत शिरणाऱ्यांनी प्रत्येक हस्तलिखिताची तपासणी विशेष अवधानपूर्वक व चिकित्सक वृत्तीनें करणें जरूर आहे; आमच्या मतें या कामीं महंतांनींच पुढाकार घेतला पाहिजे, आणि युनिव्हर्सिटीनें उच्च अभ्यास क्रमांत या संशोधनास प्रोत्साहन दिले पाहिजे.

आमचे सहसंपादक चि. हरी नारायण नेने यांच्या श्रमामुळेंच हा ग्रंथ प्रसिद्ध होत आहे. त्यांनीं सांकेतिक लिपीचा अभ्यास करून प्रत्येक हस्तलिखित स्वतः तपासले आहे व प्रायः दुर्बोध, कित्येकदां अस्पष्ट व अनेकदां अशुद्ध अशी लिपि व भाषा आत्मसात् करण्याच्या उत्साहांत त्यांनीं आपली दृष्टीही मध्यंतरीं बिघडवून घेतली. ज्ञानेश्वरसमकालीन वाङ्मयाचा आस्थापूर्वक अभ्यास करून त्यांनीं तत्कालीन भाषेची रूपसिद्धि आकलन केली व महाराष्ट्री, अपभ्रंश व शिलालेख, ताम्रपटांतील मराठी अनुशासनें अभ्यासून प्राचीन मराठीच्या पूर्वरूपांचे सागोपाग निर्वचन केले. भाषाविषयक टीपा सर्वस्वीं त्यांच्यांच आहेत व या दिशेनें प्राचीन मराठी ग्रंथांचें अध्ययन करण्याची प्रथा पाडण्याचें श्रेय त्यांना देणें योग्य व न्याय्य होय आणि मोठ्या अभिमानाने व संतोषाने आम्ही त्याचा उल्लेख करीत आहोंत.

हा प्रयत्न आवडल्यास पुढील सूत्रपाठ प्रसिद्ध करण्यास आम्हांस प्रोत्साहन मिळेल व या फलाच्या लाभामुळें आमचे श्रम हलके होऊन त्यांना नवी चेतना मिळेल हें सूज्ञास सांगण्याची आवश्यकता नाहीं.

हें पुस्तक फारच थोड्या अवधींत रा. अनंतराव मोरमकर यांनी भाषा अपरिचित असूनहीं शुद्धपणे सुंदर छापून दिलें याबद्दल त्यांचे ऋणी आहोंत.

मुंबई.
१४ मे १९३१

नी. ब. भवाळकर.



# उपोद्धात.

१ प्रस्तुत भागांत "केशवराजबासां"चा " लक्षणान्वय " सूत्रपाठ महानुभावीय पंथाच्या महाभाष्य–भाष्य–प्रमेयादिकांदि अधिकृत ग्रंथांच्या आधारें टीपा देऊन प्रसिद्ध केला आहे. हीं सूत्रे श्रीचक्रधरांनीं प्रथमतः आपल्या शिष्यांस सांगितलीं व नंतर त्यांचा पहिला संग्रह माहींभट्टानीं आपल्या लीलाचरित्र या ग्रंथांत केला. त्यांनीं संस्कृतांत रत्नमालास्तोत्र नांवाचा दुसरा पद्यग्रंथ ( १२८५ ) तयार केला व त्यांतही चक्रधराचें चरित्र वर्णिलें आहे. श्रीकेशीराजसूरी यानी देखील पद्यांत पण मराठीत मूर्तिप्रकाशांत ( १२८४ ) तेच निरूपण केले आहे. चक्रधराची दीनचर्या "पूजावस्वरांत" केशराजबास, भास्करबास, आणि भावेदेवव्यास यांनीं वेगळे ग्रंथ लिहून नमूद केली आहे व चक्रधर ज्या ज्या ठिकाणी गेले व आपल्या " लीला " केल्या त्या संबंधस्थानांची माहिती मुनिव्यास कोठी यांनी " स्थानपोथींत " ( १३५३ ) आणि शार्ङधर भोजने यांनीं " तीर्थमालिके "त दिली आहे. सारांश आजकालच्या चिकित्सायुगास आवश्यक भासणारी चरित्रग्रंथाची सर्व प्रकारची साधनसामुग्री या व दुसऱ्या अनेक शिष्यांनीं व सांप्रदायिकांनीं पूर्वींच जमवून ठेवली आहे; त्यामुळे चक्रधराच्या चरित्राची व तत्कालीन परिस्थितीची माहिती त्या ग्रंथांत भरपूर मिळेल अशी खात्री आहे.

चक्रधराच्या चरित्राबद्दल आम्हीं येथें निराळे लिहिणे कांहींसे अस्थानीय म्हणून ते कार्य यथाकाळीं अन्यत्र करूं.आज मुख्यतः ज्या चक्रधरसिद्धांत ग्रंथाचा पहिला भाग प्रसिद्ध होत आहे, त्याबद्दलच लिहिणे रास्त होईल. चक्रधरांनीं स्वतः असा कोणताच ग्रंथ लिहिला नाहीं; त्यांच्या सिद्धांताच्या ज्या संहिता हल्लीं प्रसिद्ध आहेत त्या देखील त्यांच्या हयातींत व खुद्द देखरेखीखालीं तयार झाल्या असेंही असंदिग्धपणे सांगतां येणार नाहीं; फक्त तशा प्रकारचें अनुमान करण्यास आधार आहे हे पुढे स्पष्ट होईल.

चक्रधरानें ज्या काळांत आपल्या पंथाची स्थापना करून धर्मनिरूपण आणि आचारचर्चा केली, तो स्थलमानानें १२६३ ते १२७२ असावा; आणि

त्यापैकीं पहिलीं ५ वर्षें पूर्वतयारींत व नंतरचीं ६ वर्षें पंथस्थापनेचा संकल्प पूर्ण करण्यांत गेलीं असावीं. चक्रधरांनीं अगोदरच " उभयगंगातीरीं " वारंवार परिभ्रमण केलें होतें व तेलंगण ( औरंगल ), वऱ्हाड, मोंगलाई, खानदेश नाशीक आणि अहमदनगर या टापूखालील प्रदेश आक्रमण केला होता; पुढे तेथें ठिकठिकाणीं आपले शिष्य स्थापून व अनेक भाविकांस अनुग्रह व दीक्षा देऊन त्यांनीं आपल्या पंथाची भक्कम उभारणी केली.

तथापि त्यांच्या पंथाचा प्रसार प्रथमतः महाराष्ट्रांतच झाला; त्याची सीमा आचारमहाभाष्यांत दिली आहे. आचारपाठाच्या १ ल्या सूत्रावर स्पष्टीकरण करीत असतां ते देशाची व्याख्या देतातः " देश म्हणजे खंडमंडळ । जैसे फलेठाणापासौनि दक्षिणेसि मऱ्हाटी भाष जेतुला ठाइं वर्ते ते एक मंडल । तयासि उत्तरे बालेघाटाचा सेवट असे । ऐसे एक खंडमंडळ । मग उभय गंगातीर तेहि एक खंडमडळ । आन तयापासौनि मेघकरघाट ते एक मंडळ । तयापासौनि आवघे वराडः तेहि एक मंडळ । पर आघवीचि मिळौनि महाराष्ट्रचि बोलिजे । किंचित किंचित भाषेचा पालट असे म्हणौनि खंडमंडळें म्हणावीं । मग ऐसे मंडळींचा पैला मंडळासि जाएः आन पैले मंडळींचा ऐलासि ए । तया पुरुषाचे तेचि सेवट जाणावे ।". पुढें २४ व्या सूत्राचे व्याख्यान करतांना महाराष्ट्राचे पारमार्थिक वैशिष्ट्य फारच मार्मिकपणाने दाखविले आहे; महाराष्ट्रीं असावें, तेलंगणांत अगर कर्नाटकांत किंवा कोल्हापुरप्रांतीं विरक्तानें राहूं नये असें चक्रधराने कां सागितले याचा खुलासा करीत असताना महाभाष्यकार म्हणतातः—" एका देशाचिया भूमी राजसा पर मनुष्ये राजसे नव्हेति । एक देशीं मनुष्ये राजसे आन भूमी सात्विका का तामसा । एके देशीची भूमी राजसा सात्विका पर मनुष्यें राजसे तामसे । ऐसे विचित्र प्रदेशाचे महद्भूतांसहित पालट असत । मनुष्येचे पालट असतः पदार्थांचे पालट असत । वाराः झडः उष्णः उदकेंः पाषाणः वृक्षः धान्येः अन्नेंः औषधें इत्यादिकांचे देशपरत्वें पालट असत । ". म्हणून रजदोषामुळें दोन्हीं देशांचा त्याग विहित होय असें बजावून महाराष्ट्रांतच असावें, आपले कु–देश सोडावेत, व महाराष्ट्रांतच राहून मोक्ष साधावा असा अभिप्राय देऊन " महाराष्ट्र

म्हणितलेया तयाचे किती भेद ।" तें स्पष्ट करितात. "एक महाराष्ट्र जडः दुसरें चेतन । जडांत देशः गांवः विजनः निद्रास्थानः भोजनस्थानः ऐसे पांच भेद असत । आन चेतन म्हणतलिया दोन्हीं भेदः एक स्थावरः दुसरें जंगम । स्थावरांतु नित्यकीं माडः नैमित्यकीं दाट साइली जयाची ते रुख लाभेति । आतां जंगम म्हणजे चरणल ते । तयाचे भेद सूक्ष्म जंतुपासौनि मनुष्यपर्यंत । इतुकेयांसि अभय वर्ते जयाचेनि ते पुरुष महाराष्ट्र । तयाचे दोनि भेद । बोधा अनुसरणापासौनि शाब्दांचा निर्वाळापर्यंत एक एकचि पुरुष हो अथवा एकैकापासोनि एक एक गुण होए । ऐसें बहुत आसत । तया आवघेयांचा थोवा मिळौनि एक भेद आन जेतुके सुहृद तेतुकेयांचाही दुसरा भेद । ऐसें जड चेतन भेद मिळौनि महाराष्ट्र म्हणजे महंत राष्ट्र । म्हणौन महाराष्ट्र । महंत म्हणजे थोर । तर तेचि थोरी कवणें कवणे अर्थें असे पा । ना । सात्विक हा एकः दुसरा सुखरूपः तिसरा इष्टकारकः चौथा निर्दोषः पांचवा सगुण । तर निर्दोष म्हणजे अनिष्ट न निफजे । आन सगुण म्हणजे इष्टचि निफजे । ऐसे पांचा अर्थभेदीं महाराष्ट्र थोर । आणिक कैसें थोर । नाः जेतुका अर्थीं आपली थोरी असे तेतुलाहि अर्थीं आणिकासि थोरी करी । थोरापासोनि महाथोर तयातें महाराष्ट्र म्हणिजे । तर राष्ट्र शब्दे आणिक देश बोलिले असत कीं । ना ते भूमीनें थोर होति पर गुणवृद्धीने नव्हेति । आन राजस तामस उदासही असत । म्हणौन ते महाराष्ट्र नव्हेति । एवं जडचेतनांमध्ये मागिलां पांचा गुणांचें अनुवर्तन जेतुलां ठाइं असेल तेतुला तेतुले ते महाराष्ट्रची जाणावें ।" ( पृष्ठ २४ "कर्मभूमी" टीप पहा )

२ केशराज बासांचा जन्म एका गर्भश्रीमंत ब्राह्मणकुळांत झाला. त्यांचे आजे अनंतभट कूर्वि हे कन्हर जाधवाचे ( १२४७–६० ) कोशाधिकारी व दुर्गनियंत्रक होते. हे मूळचे पैठण नजीकच्या वरखेडवाडी नामक गांवाचे रहिवासी होते; आणि त्यांचा पुत्र चक्रपाणी यांस दोन पुत्र होते. मोठा गोपाळ पंडित; हाच पुढें आनेराज बास म्हणून पंथांत प्रसिद्धीस आला व चक्रधरांच्या सूत्रांचा अन्वय लाविल्यामुळें त्यांस "अन्वयकार"

असें उपपद मिळालें; धाकटा मुलगा केशवबास. गोपाळ पंडित हे सातां महिन्याचे जन्मले ( १२६८ ) व जन्मतः त्यांचे डोळे मिटलेले होते. दृष्टि येऊन दीर्घायुषी व्हावे म्हणून त्यांस आईने चक्रधराच्या चरणीं घातलें व त्यांच्या प्रसादाने दृष्टि आली. त्या वळीं चक्रधरांनीं त्याला " पारमांडल्य " अशी हांक मारली व पुढे आनेराजांनीं जो आम्नाय स्थापिला त्याला तेंच अभिधान मिळालें. हे दोघे भाऊ पुढे नागदेवाचार्यांचे शिष्य झाले आणि कालांतराने गोपाळ पंडित हे रामदेव जाधवाच्या ( १२७१-१३०९ ) धाकट्या कामाइसा राणीकडे पुराण सांगण्यास व त्यांच्या खाजगीची व्यवस्था पहाण्यास राहिले.

चक्रधराच्या निर्याणानंतर या दोघां भावांनीं " लीलाचरित्रां "तून चक्रधराच्या मुखींचीं सूत्रें वेगळीं काढून संकलित केलीं व प्रत्येकाने वेगळाले " पाठ " तयार केले. या सूत्रांच्या लक्षणांचे स्पष्टीकरण करण्याच्या उद्देशाने गोपाळ पंडितांनीं " द्वात्रिंशल्लक्षण " नांवाचा संस्कृत ग्रंथ केला व त्याची प्राकृत टीकाही लिहिली. या ग्रंथावर दुसऱ्याही मराठी टीका आहेत व त्यापैकीं एका ( लक्षणरत्नाकर ) टीकेचा प्रारंभींचा कांहीं भाग १९२०-२१ मध्यें भारतऐतिहासिक मंडळाच्या त्रैमासिकांत आला आहे. चक्रधर-सूत्रांचें संकलन, निबंधन आणि लक्षणनिर्वच या दोघां भावांनीं नागदेवाचार्यांच्या देखरेखीखालीं केला; त्यांचा काल ( १२६८–१३४० ) आणि नागार्जुनाचा काल ( १२३६–१३०२ ) असल्यामुळे हे सूत्रपाठ १२७२ ते १३०३ या तीस वर्षांच्या अवधींत तयार झाले असावे.

३. परमेश्वरस्वरूपाचें समग्र प्रत्यभिज्ञान देणारीं हीं १८६२ चक्रधरसूत्रें महानुभावियांस श्रुतिकल्प वाटतात व त्यांस नागदेवाचार्य हे "शास्त्रवचनरूप परमेश्वरु" म्हणतात. या सूत्रांचें स्वरूप अविचलित असें आजपर्यंत अबाधितपणें कायम ठेवण्यांत आलें आहे. तीं प्रथमतःच अत्यंत आस्थापूर्वक व शुद्ध स्वरूपांत वेंचलीं होतीं; याबद्दलची शिस्त किती कडक होती तें माहिंभट्टास लीलाचरित्र लिहितांना नागदेवाचार्यांनीं दिलेली ताकीद कशी होती तें आणि

माहिंभट्टानें गोळा केलेली माहिती स्वतः नागदेवाचार्य कशी विवेचकदृष्टीनें तपासून पहात असत त्याची हकीकत वाचल्यानें लक्ष्यांत येईल. " माहिंभटीं भट्टोबासापुढां आवघें सांघीतलें । गोसावियाचिया लीला शोधुनि आणिलियाः तिया संवादिलिया । होए ते भटोबास मानिति । नव्हे तेथ माहिंभट्टा हे श्रीमुखींचे शब्द नव्हेतिः हे होतिः ऐसे निरूपिति । म्हाइंभट्टा म्हणितलें: उपाध्याचिए अनुभवीचिया तेया उपाध्येयाते पुसाविया । नाथोचिया नाथोतें: साधाचिया अनुभवीचिया तिया साधातें पुसाविया । ऐसेयाचि परि जेयांचियें अनुभवीचिया तिया तेयातेचि पुसाविया । ऐसे भटीं माहींभटा विहिले । मग महींभटीं तैसेंचि करूनि मागिलापरीं भट्टोबासासि संवादीलिया ।" ( स्मृतिस्थळ ). हा दंडक " श्रीमुखींच्या " शब्दांसंबंधीं म्हणजे सूत्रांबद्दल अधीकच कडकपणें निःसंशय पाळला असला पाहिजे.

या अनुमानास दत्तराज मऱ्हाठे महानुभावांच्या " लक्षणबंधांत " देखील सांप्रदायिक पुरावा मिळतो. " ऐसें सकळ शास्त्र प्रकरणवशें भट्टोबासीं मुख्य समस्त भक्तिजनांप्रति गोसावी निरोपिती । तेथ पाठचि निरोपिती अथवा आर्थचि निरोपिती । कदाचितीं पाठार्थ दोन्ही निरोपिती । तीं आवसरीं एकासि एक आन आणिकासि आणिके निरोपिलें ऐसें नाहीं । आधिकार्यें अनाधिकार्यें तयां समस्तावर आनंदघन परमामृत सारिखाचि वर्षला । मग अधिकारभेद एकासीं धरे एकासीं न धरें ते वेगळ । पर समदातेयानें विषमता केली नाहीं । त्रिकाळ निरूपणी होए । तेंचि तयातें पुसपुसों त्रिशुद्धी येथानुक्रम धरवीति बोलवीति । का जे घडणेया मवणेयाची दृष्ट ते भटोबासावरी असे । खाती सुरियेचि न्यायें घडिलाः (पृ. ८९ पहा) आचारविचार निरोपण करूनि प्रेमसुखा योग्ये केला । आचार्या पदीं बैसविला । आनेघा ज्ञान बोले ऐसा वर दीधला कीं तेणें वरदायें गोसावियाचा आविवे ( ? ) मानी । आपुलीया सिस्येयासि निरोपितां एकासि एक आणिकासि आणिक ऐसें सांघीतलें नाहीं । सकळासीहि सारिखे निरूपिलें । मग तेथ बोलुनि दावीः जेंचि सांगितलें पंडित केशोदयासि तेंचि सांगितलें शेवटिलें म्हातारीसी । पर आधिकार्यासि

न्यून्याधिक्य धरिते गेले तें वेगळे । पर आधिकार्ये बहुत निर्वाळले । तया-मध्यें दोघांची बहुत प्रशंसा केली । पंडिता केसदया ! तुम्हीं माझे डोळे कीं गा म्हणितले । तुमचेनि माझी विद्या उजळली म्हणितले । ऐसें जे निर्वाळले तयां-करवीं आपणया सन्मुख द्वादश प्रकरणान्वयो लावीला । तेथ एक पाठपूर्वक निरूपिती आन एक पाठरूपचि निरूपिती । तियेंचे नवही प्रकरण आचार-विचार ऐसीं अकरा प्रकरण सबंध विहिलीं । तैसीचि चौदोत्तरशत दृष्टांत-संबंधीं विहिले । तथा द्वादश प्रकरणामध्यें आशेष विद्यासांकेत असे । मग मोकळ निरोपण आन आर्थ वचन: तियें तैसीचि निरोपिलीं । तयांचिया टांचणीयासि सेरवळी ( शिर+ओळ ) केलिया । ते लक्षणादि पक्षीं तिहीं स्थळीं वर्तत आसति । ऐसा आशेष ब्रम्हविद्येचा झाडा केला । " या अवत-रणावरून असाच निष्कर्ष निघतो कीं चक्रधरांच्या चर्चा चालत असतांना भटो बास नेहेमीं हजर असत व चक्रधर त्यांना अत्यंत जिव्हाळ्याने आपलीं मतें सांगत असत. एखादा कुशल लोहार ज्याप्रमाणें आपल्या आवडीचें हत्यार मेहनतीने व काळजीपूर्वक तयार करितो त्याचप्रमाणें भटोबासास चक्र-धरानें तयार केलें आणि त्यांच्या सिद्धांताची स्थूलमांडणी व लक्षण आचार-विचार व दृष्टांत हे विभाग त्यांच्या हयातींतच झाले असावेत.

केशराज व गोपाळ पंडित हे चक्रधरांचीं सूक्तिमौक्तिकें वेंचीत असतां त्याच काळांत लक्ष्मेंद्रभट राजुरकर, नागदेवाचार्य शिष्य, यांच्या "आचारादि नऊ प्रकरणे " ( १२७८ ) या ग्रंथाचाही उल्लेख आढळतो; नागांबिकेचा "आचारविचार-मालिका" (१२७८) या ग्रंथाचाही दुसरा उल्लेख येतो, आणि रामेश्वरबासकृत " मालिका " ( १३१३ ) व राघोपंडितकृत " दृष्टांत " व " प्रश्नोतरीविधायक " ( १३१२ ) या ग्रंथांचाही निर्देश केलेला दिसतो. या व दुसऱ्याही उल्लेखांवरून चक्रधराच्या निर्याणानंतर त्यांचे शिष्य त्यांच्या शिकवणुकीचें निबंधन करण्यांत व्यग्र होते असेंच अनुमान निघतें. १३२५ च्या सुमारास आनेराजांनीं " द्वात्रिंशल्लक्षण " रचून सूत्रांचा अन्वय निश्चित केला असावा; आणि " प्रकरणवशां "त परशरामबासांनीं त्या

सूत्रांच्या प्रसंगांचें स्पष्टीकरण केलें व १३५३ मध्यें "हेतुस्थळ" रचून न्यायेबासानीं सूत्रांच्या उद्देशांची स्पष्टता केली. पुढें १४०३ पर्यंतच्या काळांत सूत्रांच्या शब्दार्थांच्या निश्चयासंबंधानें जे चौवीस पक्ष प्रवर्तले होते त्यांचा परिहारपूर्वक विचार करून सिद्धांतेहरिव्यास व गुजरशिवेव्यास यांनीं तिन्हीं स्थळांची कायमची अधिकृत बांधणी केली; याच ग्रंथास "भाष्य" असें म्हणतात. सूत्रांचा व दृष्टांतांचा गर्भितार्थ स्पष्ट करणारे "लापिका" "प्रमेयें", "व्याख्यानें", "पट" वगैरे पुष्कळच ग्रंथ या काळांत तयार झाले. १४७८ मध्ये चक्रपाणीबास यांनीं आपल्या "लापिकेंत" सूत्रांचे अनुक्रम व औचित्य यथाप्रमाण सिद्ध केलें आहें. १६३१ मध्ये चाल्हण पंडित ऊर्फ चक्रपाणी ( भास्करमुनि पारमांडल्य ? ) यांनीं चक्रधराच्या सूत्रांची संस्कृतांत "छाया" केली; ती १९२६ मध्ये हिंदी भाषांतर व टीपा देऊन मुकुंदराज आराध्ये यांनीं प्रकाशित केली आहे.

"लक्षणान्वय" पाठावरच महानुभावीयांची पुष्कळ ग्रंथ रचना झाली आहे. भाव्यांच्या सूचीवरून तपासिता फक्त या लक्षणस्थलावर ८ महाभाष्ये १ स्थळ ( भाष्य ) आणि शेंसव्वाशे प्रमेय–पटादि ग्रंथ नोदलेले आढळतात. यापैकीं बहुतेक दुर्मिळ आहेत व त्यांचें अवलोकन व अध्ययन केलेले महंत थोडकेच आहेत; परंतु ग्रंथांची संख्या व वैचित्र्य आणि विविधता याबद्दल सूचीवरून निघणारा तर्क आस्थापूर्वक अध्ययन करणाऱ्या उपासकांस उत्साह देणारा खास आहे, आणि तो अवाढव्य प्रांत जिज्ञासू व कष्टाळू अशा वाङ्मयसेवकांस अवगाहन करण्यास पाचारण देत आहे व त्यांतून अनेक अनर्घ्य रत्नें बाहेर येतील अशी आमची मनोदेवता सांगते.

४. चक्रधराच्या सूत्रांचें अध्ययन महानुभावीय ग्रंथकारांनीं ज्या पद्धतीनें केलें ती संस्कृतपरंपरेला सोडून नाहीं; आणि प्रचलित संस्कृत कारिकांच्या नियमानुसारें त्यांनीं सूत्रांचीं लक्षणें ठरवून स्वरूपसिद्धी निश्चित केली आहे. अन्वयकारानें तीच जुनी व शिष्टमान्य अशी संस्कृतपरंपरा स्वीकारून दृढमूल केली व "पंचवार्तिकां"त भीष्माचार्यांनें देखील त्याच मर्यादा

संभाळल्या आहेत. या दोन्हीं ग्रंथांतले उतारे आम्हीं परिशिष्टांत दिले आहेत व त्यावरून महानुभावियांना मान्य असलेलीं सूत्रस्वरूपलक्षणे कळून येतील. प्रारंभीं सूत्राची मुदर पण आटोपशीर व्याख्या देऊन तिच्या प्रत्येक शब्दाचें स्पष्टीकरण केले आहे व पदांची ओळख झाल्याविना " वचनप्रत्यभिज्ञा न होएन्चि " असे बजावून पद. वचन. वाक्यादिकांचें स्पष्टीकरण करून " शास्त्रा "ची व्याख्या केली आहे. " नित्यानित्यवस्तुविवेकें करौनि आमुके मोचके आन आमुके अमोचके ऐसे जेणे कथिजे ते शास्त्र बोलिजे । " पुढें सूत्रप्रकृतीचे १० प्रकार सांगून सूत्रार्थाचा निर्णय होण्यास कारकज्ञानाची किती आवश्यकता असते ते स्पष्ट केलें आहे. " जे नागदेवाचार्यें भणितले: अगा केशवदया । हे शास्त्रवचनरूप परमेश्वरु । तें वचन जै अन्यथा वाखाणिजे तऱ्ही तेया वचनरूपी परमेश्वराचा वाखाणिता पतित होए । तेणे पुरुषें तो परमेश्वरु दुखत्रिला गा । यातव व्याकरणज्ञाने करौनि सूत्रकाराचा निर्धारु यथातथ्य जाणिजे । तै वचनाचा यथार्थ अर्थ उमटे: हें जै नसे तै नुमटेचि ।" हा निर्धार त्यांनीं तीन प्रकारचा असतो असें सांगितलें आहे; " शब्दाख्य निर्णयो व्याकरणे, अभिधानें आन अलंकारशास्त्रें जाणिजे । संप्रदायाख्य निर्णयो अधिकरणमुखें श्रवण: मनन: निदिध्यासने करौनि जाणिजे । रहस्याख्य निर्णयो सद्गुरुमुखें परसिद्धांतसूत्रे जाणिजे । " पुढे सूत्रव्याख्यान कसे असते तें सांगितले आहे; "जेथ पदच्छेद: पदार्थोक्ति: विग्रहो: वाक्ययोजना: आक्षेप: कां समाधान इये सा प्रकारें सूत्रांचा अर्थ प्रकाशित होत असे तेयातें सूत्रव्याख्यान म्हणिजे । " नंतर खंडान्वय व दंडान्वय सांगून सूत्रस्वरुपलक्षण दिलें आहे व नंतर ज्या बत्तीस लक्षणांच्या द्वारें सूत्रांचें भाव प्रतीत होतात तीं स्पष्ट करून शेवटीं " प्रतिष्ठा " लक्षण अनुवादिलें आहे. " प्रतिज्ञाप्रमाणीं परधर्मोत्कर्षालागीं प्रतिज्ञेचें ज्ञान होआवें लागे । जेणें आपुल्या शास्त्राचा उत्कर्ष प्रतिष्ठिजे तें प्रतिष्ठासूत्र । सर्व अपरांचिया व्यावृत्ति करौनि सर्वशास्त्रविषयप्रदानचतुर श्रीनागार्जुन तेणे ईश्वरप्रसादातव आर्तजनांतव चांद्रदयी ( ? ) ब्रह्मविर्येकरूनि प्रतिष्ठिला जो परधर्म ते प्रतिष्ठा बोलिजे । समान धर्मु असतां अनेकवादभेदीं प्रतिपक्षपराजयहेतुवाक्यीं

आपुलें शास्त्रज्ञान प्रतिष्ठिजे । कां आपुला कियाविशेषु किंचित प्रकटविजे । तें जेथ वर्ते ते प्रतिष्ठावचन बोलिजे । ”

५ आम्हीं प्रसिद्ध करीत असलेला सूत्रपाठ आजच पहिल्यांदा प्रकाशित होत नाहीं; १९०७ च्या पूर्वी खामगांवास एक पाठसमुदायाची लिथोप्रत छापली होती आणि त्या सालीं बाळकृष्णदादा कानडे यांनीं पाठसमुदाय वगैरे पाठ ग्रंथ ओंकारदादा परंडेकर यांच्याकडून संपादन करवून सोलापुरास एकत्र प्रकाशित केला होता; परंतु हे दोन्हीं ग्रंथ सांप्रदायिक व ‘ सरळा-लिपीं’ त होते, व ते विशेष प्रसिद्धीस आले नव्हते. १९१५ मध्यें कै. वा. वि. का. राजवाडे यांनीं भा. इ. मंडळाच्या १८३७ च्या इतिवृत्तांत “ लक्षणान्वयपाठ, ” “ मानभावांच्या ब्रह्मविद्येचीं स्थूल तत्त्वें ” या अभिधानानें प्रकाशित केला; परंतु या प्रकाशिताकडे विद्वानांचें विशेष लक्ष गेले नसावेंसे वाटते. आम्ही आमचा पाठ शेंदीडशे वर्षांच्या जुन्या अशा तीन हस्तलिखित प्रतींवरून व इतर संदर्भग्रंथांतील अवतरणांवरून शुद्ध करून निश्चित केला आहे व पाठभेदही दाखल केले आहेत.

हा पाठ तयार करितांना आम्हांस (१) मऱ्हाटे–लक्षणबंध. ( २ ) गुजरशिवबास–स्थळपोथी. ( ३ ) मुरारीविद्वांस–पूर्वीपट. ( ४ ) मु. विद्वांस–पूर्वीव्याख्याने, (६) मु. विद्वांस–विद्यासार, ( ७ ) विश्वनाथबास बीडकर–आचारमहाभाष्य, ( ८ ) वि. बास–संसरणप्रमेय. ( ९ ) मुरारीबास कवीश्वराम्नाय–महावाक्यप्रमेय, ( १० ) मु. बास–निवर्चनप्रमेय, ( ११ ) श्रीमूर्तिज्ञान, (१२) नामाचें व्याख्यान, (१३) अन्यव्यावृत्तिसरवळे आणि (१४) चाल्हणकृत संस्कृतछाया इत्यादि हस्तलिखित पोथ्यांचा व पुस्तकांचा उपयोग झाला. वरील बहुतेक सर्व ग्रंथ १५ व्या शतकांतले आहेत व टीपा देतांना आम्हीं त्यांतून भरपूर उतारे दिले आहेत. याखेरीज दुसरेही मान्य ग्रंथ अस्तित्वांत आहेत; पण ते उपलब्ध नसल्यामुळें आम्ही आपल्या स्पष्टीकरणाच्या टीपा वरील ग्रंथाच्या आधारानें तयार केल्या आहेत. त्यांच्या साह्यानें चक्रधराच्या सिद्धांताचें स्थूलस्वरूप–निदान शब्दाख्य निर्णय तरी–समजेल अशी अपेक्षा

आहे. या सिद्धांताच्या विशेषांचें स्पष्टीकरण जागोजागीं टीपामध्यें केलें आहे, व आम्हीं लवकरच या भागाची पूरणिका काढणार आहोंत त्यांत चक्रधरसिद्धांताची सविस्तर चर्चा करूं.

पाठाच्या अखेरीस ज्या टीपा दिल्या आहेत त्या बहुतेक सांकेतिक लिपींत लिहिलेल्या महानुभावीय पोथ्यांवरून उतरल्या आहेत असे मागें सांगितलें आहे. असें करण्यास अनेक कारणें आहेत; त्यांच्याच सांप्रदायिक शब्दांत या " श्रुति " पाठाचा अर्थ दिल्याने पंथाच्या लोकांचा गैरसमज प्रायः होणार नाहीं; दुसरें कारण हे कीं या पाठांवर त्यांच्या पंथांत कोणत्या स्वरूपाची व किती विविध रचना झाली आहे हें वाचकांच्या नजरेस आणावे. ज्ञानेश्वराच्या काळापासून एकनाथापर्यंत महानुभावी वाङ्मयांत आपल्या मराठी साहित्याचे किती विविध नमुने आहेत व त्यांची भाषा व धाटणी कशा प्रकारची आहे याची वाचकांस चांगली ओळख व्हावी व त्याबरोबरच अभियुक्त वाङ्मयांत वाखणिलेले अनेक गुण या उताऱ्यांतही कसे दिसून येतात याची जाणीव व्हावी. या टीपांत ठिकठिकाणीं विद्वत्ता, सूक्ष्मचिकित्सा, विविधशास्त्रपटुता, प्रेमळपणा, गांभीर्य, व्याकरणपटुत्व, न्यायसिद्धांतवादित्व, तार्किकपणा वगैरे सर्व पाहावयास मिळेल. तत्वज्ञानाच्या दृष्टीने संसरणावरील टीपा अवश्य पाहाव्या; महावाक्यावरील टीपांत ठिकठिकाणीं प्रेमळपणा, सात्विकपणा व माधुर्य; निर्वचनांत शब्दव्याख्यानकुशाग्रता; आणि मानसिक अवस्थांचे पृथक्करण ठिकठिकाणीं सूक्ष्मपणे केलेलें आढळेल. सारांश टीपांमध्ये निवडलेला मजकूर देखील अप्रकाशित आहे, व त्यांत संस्कृतांतील शास्त्रीय ग्रंथाच्या धर्तीवर सूत्र, भाष्य, महाभाष्य, प्रवचन, व्याख्यान, इत्यादि वेगवेगळ्या पद्धतींचा प्रपंच मराठींत देखील ज्ञानेश्वरोत्तर कालांत उत्कृष्टपणें कमावलेल्या गद्यांत झाला आहे, हें पाहून प्रत्येकास आमच्याप्रमाणेंच हर्ष व अभिमान वाटेल, यांत शंका नको.

६. या पाठावर आम्हीं भाषाविषयक टीपा वेगळ्या दिलेल्या आहेत, व त्यांत प्रसंगतः वाक्यरचनेबद्दल व व्याकरणाबद्दल ओझरतें स्पष्टीकरण केलें आहे.

त्याविषयीं सविस्तर चर्चा आचारपाठ व विचारपाठ प्रसिद्ध झाल्यावर करण्याचा बेत आहे. लक्षणसूत्रपाठाच्या भाषेकडे चिकित्सापूर्वक पाहिल्यास प्रथमत: त्यांतील शब्दांच्या निरनिराळ्या रूपांच्या मूळाशीं दीर्घ उच्चार-प्रवृत्ति व संस्काराभावीं जिव्हेचें शैथिल्य यांचा परिणाम झालेला दिसतो. वाक्यविकास व नामधातूंच्या विविधरूपांचा भरणा या दृष्टीनें लक्ष दिल्यास वाचकांचा गैरसमज होण्याचा संभव आहे; निम्म्याहून अधिक सूत्रांत ' अस् ' धातूचीं रूपे गुप्त आहेत; आणि जवळजवळ त्याच प्रमाणांत होए, नव्हे; बोलिजे, बोलिजति; उरे, नुरे–असलीं सरळ वर्तमानकाळाचीं रूपें योजिलेलीं आढळतात. दोन चार प्रयोजकरूपें, दोन हेत्वर्थकें, चार वर्तमानकाळवाचकें, चार पांच भूतकाळवाचकें, एक आज्ञार्थ, एक विध्यर्थ, एक दोन क्रियावाचक नामें, ' परि-कां-कीं-यत् ' हीं उभायान्वयी अव्ययें, अशी व्याकरणाचीं फारच थोडीं रूपे लक्षणपाठांत मिळतात. नाहीं म्हणावयास ' म्हणौनि-जन्मौनि ' सारखी पूर्वकालवाचकें, आणि 'स्तव-पासौनि-वीण-सवे-पर्यंत' इत्यादि शब्दयोगी अव्ययें बरींच आहेत; संबंधीं रचनेचीं ५-६ वाक्ये आहेत; आणि भविष्य-काळाचा अर्थ निघणारें वर्तमानकाळाचे रूप असणारे एकच वाक्य आहे. बहुतेक वाक्यें अगदीं साधीं आहेत; डौलदार, चटकदार अगर म्हणीवजा अशीं वाक्यें या पाठांत थोडींच आढळतात, आणि व्याकरणाचा प्रपंच अल्प दिसतो.

यावरून सूत्रांच्या भाषाविषयक महत्त्वाबद्दल गैरसमज झाल्यास ते स्वाभाविक होईल, परंतु ती शंका अस्थानी होय; कारण भीष्माचार्य वार्तिककार यांच्या शब्दांत सांगितल्यास लक्षणान्वय पाठाची ' सूत्रप्रकृति '–सूत्रांची ठेवण–,तशी असणे अपरिहार्य आहे. लक्षणपाठांत आचारपाठाप्रमाणें विधि–निषेधप्रदर्शक सूत्रें असण्यास जागा नाहीं; त्यांत केवळ ' संज्ञासूत्रे ', ' अर्थ-ज्ञापकसूत्रे' 'संख्याज्ञापकसूत्रे,' 'लक्षणसूत्रें,' अथवा 'नियमसूत्रें' यांचाच भरणा अधीक असणें स्वाभाविक आहे; म्हणून त्यांत नामांच्या व धातूंच्या प्रपंच-विस्तारास अवकाश मिळत नाहीं, व विषयरचनेच्या प्रवाहास अनुरूप अशींच वाक्यें त्यांत येणे ओघानें प्राप्तच आहे. तरींही पुढील सूत्रें ( १६–४;

१७–४; २४–१; २४–८; २५–४; २६–६; ) नमुन्यादाखल दिलीं आहेत, व त्यांत भाषेचा डौल, घोंसदारपणा व अल्पाक्षरांत सारवत्ता साधण्याची खुबी वाचकांच्या सहज ध्यानांत येईल.

७. चक्रधरानें आपल्या सिद्धांताचा उपक्रम पूर्वीमध्यें केला आहे; परमेश्वराशिवाय मोचन नाहीं; तो परमेश्वर वस्तुतः निराकार व निरवयव असला तरी " परकृपावशें सावेवो साकारु होए: अवतरे: आपुले संनिधान दे: तें दास्येमोचक ।", असा प्रारंभ करून कर्मभूमीच्या देवता इत्यादिक परमेश्वर नव्हेत असें बजावून त्यांना वेगळे केले आहे. नंतर युगानुयुगीं जे धर्म व आचारसाधनें होतीं त्यांच्यामुळे देखील ईश्वरप्राप्ति होत नाहीं, " परमेश्वरें परमेश्वरु जाविजे: परमेश्वरे परमेश्वरु पाविजे" असे पुन्हां एकवार सांगून त्याला प्राप्त करण्यास प्रचलित विद्या अगर " वेध " असमर्थ आहेत हें स्पष्ट केलें आहे. यानंतर मुख्य विषयास प्रारंभ करून सृष्टीच्या संहारसंसरणाची उपपत्ती व अनुक्रम देऊन व ईश्वरस्वरूप निर्वचून महावाक्यांत आणि उद्धरणांत आपला सिद्धांत स्पष्ट करून मुमुक्षूने " विकारविकल्पु शुन्यु: स्वभावमात्रें: निरालंबी: देवतास्मरणें जो जन्म क्षेपी तेयासि परमेश्वरु पुनरपि आपुला संबंधु देति । " असें आस्तिपर वाक्य सांगून लक्षणपाठाची समाप्ति केली आहे.

संसार हा अज्ञानमूलक असल्यामुळे ज्ञान हेंच एक अज्ञानाचे मोचक होय. जीव–प्रपंच–देवता आणि ईश्वर यांबद्दल आपले पूर्वापार अज्ञान नष्ट झालें पाहिजे. तें अज्ञान उलट वृद्धिगंत होण्याची अनेक कारणें आहेत; " पूर्वी ईश्वरें ज्ञान दिधलें होते तै कां नासेचि । ना: तें ज्ञान जीवे अपराधें धाडिलें । जीदासीं ज्ञान धाडितिं बहुतें कारणे । कथने जाए: विपरीतबुद्धि जाए: विखएसेवा जाए: कखाए जाए: वीकल्पें जाए । म्हणौनि इतुकां प्रकारीं ज्ञान धाडिलें । मा तेयास्तव आलें अज्ञान । तेया अज्ञानापासौनि निपजलें अन्यथाज्ञान । तेणें अन्यथाज्ञानें जीव आनांतें आन म्हणत गेला । जैसें ताकातें दूध म्हणे: बेगडें तें सोनें म्हणें । तैसे देवतांतें ईश्वरु म्हणितला: जीवांतें ईश्वरु म्हणितला, प्रपंचातें ईश्वरु म्हणितला । तेयास्तव स्वर्ग: नरक:

कर्मभूमिः मोक्ष या चतुर्विधातें आपजविलें । ”......“ अच्युताच्या अज्ञानीं जें जन्मलें एथार्थज्ञान तें तेया चतुर्विधा कर्मफळाचा नाश करीत असे । तरीं ज्ञान ऐसें तें कवणातें म्हणितलें । नाः जेया देखणें कांहीं उरलेंचि नाहीं तेयातेंचि म्हणितलें । ” ......“ज्ञान ऐसें तें विशेखातेंचि (विशेषज्ञान) म्हणितलें । कां पाः तिए ज्ञानीं कांहींचि नुरे । सामान्यीं मळकर्मावेगळा झालाः सकळांही देवतांवेगळां झालाः दोनी शक्ती वेगळीया करुनि एरीं सकळाही शक्ती ईश्वरें तेयासि दान दीधलीया सकळांसि तो प्रमाणद्रव्ये जाला असे । आद्यमळ आन चरमदेहेसीं कृपास्पदीभूत होऊनि वर्तत असे । ” सामान्यदानानें विशेष-ज्ञान प्राप्त होतें. आणि ते सामान्य ज्ञान सत्ताज्ञानानें व ती सत्ता शाब्दज्ञानानें प्राप्त होते. “ तरी शाब्दासीचि काइ कारण । नाः प्रतीतीः कितिया । ना तीन । तियां कवणी । नाः आत्मप्रतीतिः शास्त्रप्रतीति आन ईश्वरप्रतीति । ” “ म्हणौनि ऐसें प्रतीतीपर ज्ञान होआवें: पर तेंचि ज्ञान स्वरुपनिर्धाराचें होवावे । ” ( पृ० ४९ पहा ).

हे ज्ञान समग्रतः फक्त “ महावाक्यांत ” दिलेलें आहे; अन्यव्यावृत्तीत देवता व ईश्वर यांचे निरूपण केले आहे, तर युगधर्म व विद्यामार्ग यांत देवतांचे अंतर्याग व बहिर्याग सांगितले आहेत. संसरण व संहार प्रकरणांत प्रपंचाची मांडणी व मोडणी दिली आहे, तर आस्तीपरि व उद्धरणांमध्ये मायापुरधार्य व “ नखचर्म रोमादि करूनि सुध चैतन्यचि ते ” आणि “साध्यसाधनाकारे आकारले करचरणवंत ब्रम्ह हें ” अशा अवतरलेल्या परमेश्वराचें वर्णन आहे. “ निर्वचां ”त ईश्वरस्वरूप कांहीसे दिले आहे, पण त्याचे महंतज्ञान ते “ महावाक्यांत ” सांठविले आहे. “ एरें प्रकरणें एकदेसिए कीं । जैसी सरिता आन समुद्र । सरिता समुद्रीं सामावलीयाः परी समुद्र सरिती न सामावें । तैसें महावाक्यीं इए सकळ प्रकरणें सामावली पर महावाक्य एयांत न सामावे । हे जाणितलेया सकळ शास्त्र जाणितले होए ।”. असे तें महावाक्य म्हणजे जीव नामक जी नित्य, केवळ, अनादि आणि अविद्यायुक्त वस्तु आहे, तसेंच विश्वरूपापासून तों मृतिकेपर्यंत जो प्रपंच आहे, यांहून वेगळा असाः व सत् म्हणजे ब्रम्ह, चित् म्हणजे माया

आणि आनंद म्हणजे ईश्वर असें ज्याचें त्रिअंश स्वरूप आहे: तो परमेश्वर सर्वशक्तियुक्त आहे. "ऐसा गुणधर्मयुक्त परमेश्वर तो आठवीजे: चींतीजे: ध्याइजे: स्मरीजे ।." अखेरीस परमेश्वराचें निर्वचन करून अवतार कसा होतो, व अवतारी पुरुषांचें कार्य काय असतें याचा प्रपंच केला आहे. ते "कर्मभूमीस्तीतां मनुष्यदेहयुक्ता जीवां ज्ञानपर्यंत आपुला संबंध देति;" "एका प्रेम संचरीति;" "प्रेमसंचारमात्रें वीकारु वीकल्पु स्वभावो तीन्ही उछेदुनि जाति;" "एकां जीवाप्रति परा गिरा करूनि परमेश्वरु आपुलें स्तीत्व साधिति;" "अनुसरलेंयांचें आगांतुक कुंठे: अनारब्ध सुके: प्रारब्धा भोगीं क्षयो." या परमेश्वरी कृपेच्या पायऱ्या उद्धरणांत अनुक्रमानें दिल्या आहेत; त्या मूळ ग्रंथांत पहाव्या.

नागपूर, सीताबर्डी.
ता. २६–४–३१

नी. ब. भवाळकर
ह. ना. नेने.



# श्रीचक्रधरसिद्धान्तसूत्रें

## भाग पहिला.

### लक्षणान्वयसूत्रपाठ.

श्रीपरेशाए नमः । सृष्टीमध्यें कव्हणें करणें मुचिजेना एकें परमेश्वरें वीणें[1] ॥ १ ॥ तोचि परमेश्वरु नीर्वेव[2] नीराकारु अंसे[3] ॥ २ ॥ परकृपावशें सावेवो[4] साकारु होए ॥३॥ अवतरे आपुलें[5] सन्निधान दे ॥ ४ ॥ तें दास्येमोचक[6] ॥ ५ ॥ एवं पूर्वी संपूर्ण ॥

जैसे द्वापरी श्रीकृष्णचक्रवर्ति ॥ १ ॥ जैसे सैह्याद्रीं श्रीदत्तात्रए प्रभु ॥ २ ॥ जैसे द्वारावतीए श्रीचांगदेवो राउळ ॥ ३ ॥ जैसे रुधपुरी श्रीगुंडमराउळ ॥ ४ ॥ जैसे प्रत्येस्थानीं श्रीचांगदेवो राउळ ॥ ५ ॥ एवं नामनिर्धार संपूर्ण ॥

---

१ विण–पू. प.; २ निरवएव निराकार–पू. प; ३ पू. प. मध्यें "असें" नाहीं; ४ सावेव; ५ अगुलें–पू. प.; ६ दास्यमोचक–पू.प.;

द्वापरी श्रीकृष्णचक्रवर्ति गोसावीयांचे चरण-शरण ॥ १ ॥ सैह्याद्री श्रीदत्तात्रएप्रभु गोसावीयांचे चरणशरण ॥ २ ॥ द्वारावतीए श्रीचांगदेओ राउळ गोसावीयांचे चरणशरण ॥ ३ ॥ रुधपुरी आतांस्या आजी कालि श्रीगुंडमराउळ गोसावीयांचे चरण-शरण ॥ ४ ॥ प्रत्येस्थानीं श्रीचांगदेवोराउळ गोसावी-यांचे चरणशरण ॥ ५ ॥ एवं पंचकृष्ण संपूर्ण ॥

॥ १ ॥ कर्मभूमीचीया देवता होति पर पर-मेश्वरु नव्हेति ॥ १ ॥ आष्टौ देओयोनी देवता होति पर परमेश्वरु नव्हेति ॥ २ ॥ अंतराळीचे गंधर्व[1] देवता होति पर परमेश्वरु नव्हेति ॥ ३ ॥ स्वर्गीचे इंद्रचंद्रादिक देवता होति पर परमेश्वरु नव्हेति ॥ ४ ॥

॥ २ ॥ कैलासवैकुंठीचे हारिहरब्रह्मादिक देवत[ा] होति पर परमेश्वरु नव्हेति ॥ १ ॥ क्षीराब्धिच[ी] शेषशय्या[2] देवता होए पर परमेश्वरु नव्हे ॥ २ ॥ अष्ट भैरव देवता होति पर परमेश्वरु नव्हेति ॥ ३ [॥] वीश्वरूप देवता होए पर परमेश्वरु नव्हे ॥ ४ [॥] चैतन्ये देवता होए पर परमेश्वरु नव्हे ॥ ५ ॥

---

१ गणगंधर्व; २ शेखसाया;

॥ ३ ॥ चैतन्या पर परमेश्वरुः तो श्रीचक्रधरः सकळ जीवातें रक्षता हो उद्धरिता हो ॥ १ ॥ एवं अन्यव्यावृत्ति संपूर्ण ॥

॥ ४ ॥ बत्तीस लक्ष कृतयुग ॥ १ ॥ कृतयुगी आत्मोपास्ति हा धर्मु ॥ २ ॥ भक्ती अधर्मु ॥ ३ ॥ धर्मातव चैतन्येप्राप्ति फळ ॥ ४ ॥ अधर्मातव खालिली युगी जन्म ॥ ५ ॥

॥ ५ ॥ सोळा लक्ष त्रेत ॥ १ ॥ त्रेतीं भक्ती हा धर्मु ॥ २ ॥ याग अधर्मु ॥ ३ ॥ धर्मातव कैलासवैकुंठ-प्राप्ति फळ ॥ ४ ॥ अधर्मातव खालिली युगी जन्म ॥५॥

॥ ६ ॥ आठ लक्ष द्वापर ॥ १ ॥ द्वापरी याग हा धर्मु ॥ २ ॥ तीर्थ क्षेत्र व्रत दान अधर्मु ॥ ३ ॥ धर्मातव स्वर्गप्राप्ति फळ ॥४॥ अधर्मातव खालिली युगी जन्म ॥५॥

॥ ७ ॥ च्यारि लक्ष कलियुग ॥ १ ॥ कलियुगी तीर्थ क्षेत्र व्रत दान हा धर्मु ॥ २ ॥ हींसा अधर्मु ॥३॥ धर्मातव आंतराळप्राप्ति फळ ॥ ४ ॥ अधर्मातव नरक ॥ ५ ॥ उत्तमा धर्मातव अंतराळप्राप्ति फळ ॥ ६ ॥ मध्यमातव[३] अष्टौ देवयोनीप्राप्ति फळ ॥ ७ ॥ कनीएसातव[४] अधोनिक फळ[५] ॥ ८ ॥

---

१ तो देव; २ रक्षीता; ३ मध्यमा धर्मातव; ४ कनीएसा धर्मातव; ५ प्राप्तिफळ;

॥ ८ ॥ कृतयुगी लक्षभरि आयुष्य ॥ १ ॥ त्रेती दाहा सहस्रु ॥ २ ॥ द्वापरी सहस्रु ॥ ३ ॥ कलीयुगी संत[1] ॥ ४ ॥

॥ ९ ॥ या चहु युगिचां धर्मि परमेश्वरु नेणिजे ॥ १ ॥ न पविजे ॥ २ ॥ परमेश्वरें परमेश्वरु जाणिजेः परमेश्वरें परमेश्वरु पाविजे ॥ ३ ॥ एवं युगधर्म संपूर्ण ॥

॥ १० ॥ एकि वीद्या ॥ १ ॥ दोनि वीद्या ॥ २ ॥ आठ वीद्या ॥ ३ ॥ सवाव लक्ष नव कोडि वीद्या ॥ ४ ॥ बाहातरि कोडि वीद्या ॥ ५ ॥

॥ ११ ॥ एकि वीद्या[2] ब्रम्हवीद्या ॥ १ ॥ द्विधा सांभव ॥ २ ॥ अष्ठधा शाक्तए ॥ ३ ॥ सवाव लक्ष नव कोडि महा[3]नव ॥ ४ ॥ बाहातरि कोडि आर्[4]नव ॥ ५ ॥

॥ १२ ॥ वीषयाधारु वेधु ॥ १ ॥ इंद्रियाधारु वेधु ॥ २ ॥ अंतष्करणाधारु वेधु ॥ ३ ॥ देहाधारु वेधु ॥ ४ ॥ विदेहाधारु वेधु ॥ ५ ॥ केवळाधारु वेधु ॥ ६ ॥

---

१ शत; २ ते ब्रम्हवीद्या; ३ महाण्णव; ४ आण्णव;

॥ १३ ॥ वीषएवेधें वीषयांची प्राप्ति ॥ १ ॥ इंद्रिएवेधें इंद्रियांचि प्राप्ति ॥ २ ॥ अंतष्करणवेधें अंतष्करणाची प्राप्ति ॥ ३ ॥ देहवेधें देहाचि प्राप्ति ॥ ४ ॥ विदेहवेधें विदेहाचि प्राप्ति ॥ ५ ॥ केवळवेधें कैवल्याचि प्राप्ति ॥ ६ ॥ एवं विद्यामार्ग संपूर्ण ॥

॥ १४ ॥ परमेश्वरुप्रवृती माया[1] सृष्टिसंहार करी ॥ १ ॥ विखो इंद्रिए विलया जाए ॥ २ ॥ इंद्रिए अंतष्करणीं विलया जाए ॥ ३ ॥ अंतष्करण देहीं विलया जाए ॥ ४ ॥ देह विदेहीं विलया जाए ॥ ५ ॥ विदेहे ते नित्ये ॥ ६ ॥ कार्यअविद्या कारणअविद्येचा ठाइं विलया जाए ॥ ७ ॥ कार्ये कारणी विलया जाए ॥ ८ ॥

॥ १५ ॥ एकु नित्य वर्गु एकु अनित्य वर्गु ॥ १ ॥ नित्यवर्गीं जीव देवता परमेश्वरु उरति ॥२॥ अनित्यवर्गीं अनादि अवीद्या कर्मलेप उरति ॥ ३ ॥ अनादिअविद्या–कर्मलेपयुक्त जीव मायास्वरुपीं असति ॥ ४ ॥ देवता स्वरुपस्तीता होति ॥ ५ ॥ यापरि प्रपंचु संहारे ॥ ६ ॥ माया परमेश्वराची प्रवृती वोळगे ॥७॥ एवं संहारण संपूर्ण ॥

---

१ मायासृष्टिसंहार;

॥ १६ ॥ मायास्वरूपीं एकदेशीं तम[1]असे ॥ १ ॥ तमोनिमग्न जीव मायास्वरूपी असति ॥ २ ॥ परमेश्वर-प्रउर्ती मायातमोनिमग्ना जीवां चैतन्यमहं ऐसें उपजवी ॥ ३ ॥ माया जीवातें विकरे संचरे वीए प्रसवे हालवी डोचली उगळी लोटी ॥ ४ ॥ परमेश्वर० प्रउर्ती मायाव्यापारवसें अविद्यात्मक जीव चैतन्यमहं ऐसें घेउनि उठीति ॥ ५ ॥ चैतन्यमहं जीवा जन्म बोलिजेः अन्यथाज्ञान बोलिजेः आद्यमळ बोलिजे ॥ ६ ॥ मायासृष्ट[2] जीवः जीवसृष्ट[3] प्रपंचु ॥ ७ ॥ मायाकृत जीवः जीवकृत प्रपंचु ॥ ८ ॥ मायाकार्य जीवः जीवकार्य प्रपंचु ॥ ९ ॥ यापरि माया जीवातें जन्मौनि आपण उदासिन होएः परि सूत्रातें न संडि ॥ १० ॥ जीव मायेसि आधीन होए कां प्रपंचासिः[4] मध्यें असणेंचि नाहीं ॥ ११ ॥ जन्मलासांतां जीव क्षणपर्यंत सुध असेः मग मैळे ॥ १२ ॥ चैतन्य मृत्तीकापर्यंत मैळेः चैतन्या[5]सवें जीव मृत्तिकापर्यंत मैळे ॥ १३ ॥ चैतन्य चैतन्यपर्यंत उजळेः चैतन्यासवें[6] जीव चैतन्यपर्यंत उजळे ॥ १४ ॥ आनाचां करणा तेयाभिमान[7] ॥ १५ ॥

---

१ प्रवृत्ती–सं.प्र.; २ मायासृष्टि–सं.प्र.; ३ जीवसृष्टि–सं.प्र.; ४–आधीन होए; ५–सरिसा; ६–सरिसा; ७ त्यासी अभिमान;

॥ १७ ॥ मग जीव प्रपंचातें रचिति ॥ १ ॥ कां रचितिः जे अधमतिः अधगतिः अधरतिः म्हणौनि रचीति ॥ २ ॥ काइसेनि रचितिः तैं त्यासि सामर्थ्य आति ॥ ३ ॥ मग जीव नाहींतेंचि एक गंधर्वनगराकार विश्व रचिः त्यामाजि रींगेः तदात्मक होएः वीश्वमहं ऐसें बुझे ॥ ४ ॥ मग जीव नाहींतेंचि एक गंधर्वनगराकार अष्टधा प्रकृति रचिः तयामाजि रींगेः तदात्मक होएः प्रकृतिरहं ऐसें बुझे ॥ ५ ॥ मग जीव नाहींतेंचि एक गंधर्वनगराकार अनेकधा विकृति रचिः तियेमाजि रींगेः तदात्मक होएः वीकृतिरहं ऐसें बुझे ॥ ६ ॥ मग जीव नाहींतेंचि एक गंधर्वनगराकार अनेकधा वीकृति वीकृति रचिः तियेमाजि रींगेः तदात्मक होएः वीकृतिवीकृतिरहं ऐसें बुझे ॥ ७ ॥ यापरी मनुष्यपर्यंत मेळे ॥ ८ ॥ मग जीव चतुर्विधा कर्मफळां जाति ॥ ९ ॥ स्वर्ग नरक कर्मभूमी मोक्ष तें[1] चतुर्विध कर्मफळ बोलिजे ॥ १० ॥ यापरी मागौती जैसि असिली तैसी सृष्टि रचे ॥ ११ ॥ माया परमेश्वराची प्रउती वोळगे ॥ १२ ॥ एवं संसरण संपूर्ण ॥

---

१ यातें:

॥ १८ ॥ जीव-प्रपंचु-व्यतिरीक्त सच्चिदानंद-स्वरुप परमेश्वरु एकु आतिः तो सर्वशक्तियुक्त ॥ १ ॥ नित्य केवळ अनादि अविद्यायुक्त वस्तु एक आतिः ते जीव शब्दें बोलिजे ॥ २ ॥ विश्वरूपाचिए ठाउंनि[1] मृत्तिकापर्यंत प्रपंचु बोलिजे ॥ ३ ॥ व्यतिरीक्त भणिजे वेगळा ॥ ४ ॥ सत् शब्दें ब्रह्म बोलिजेः चित् शब्दें माया बोलिजेः आनंद शब्दें ईश्वरु बोलिजेः ब्रह्म माया ईश्वरु ऐसा त्रीअंशु परमेश्वरु एकु आति ॥ ५ ॥

॥ १९ ॥ शक्ति शब्दें सकळै देवता सकळै गुण सकळै धर्म ज्ञान विज्ञान[3] हे सर्व शक्ति शब्दे बोलिजे ॥ १ ॥ युक्त भणिजे एतत् सहित ॥ २ ॥ सौंदर्य लावण्य सौभाग्य ओदर्य[4] दया मया कृपा कारुण्य एवमादिक अनंत गुण ॥ ३ ॥ नित्यत्व व्यापकत्व सर्वात्मकत्व सर्वातीतत्व सर्वकर्तृत्व सर्वसाक्षित्व एवमादिक अनंत धर्म बोलिजति ॥ ४ ॥ एवं महावाक्य संपूर्ण ॥

॥ २० ॥ आनंदें शब्दें ईश्वरु बोलिजे ॥ १ ॥ आनंद तो ॥ २ ॥ ब्रह्म तो ॥ ३ ॥

---

१ पासौनि–म. वा. प्र.; २ सकळही; ३ ज्ञानविज्ञानणे; ४ औदार्य–म. वा. प्र.;

॥ २१ ॥ अच्युत तो ॥ १ ॥ अविक्रियु तो ॥ २ ॥ अव्यक्त तो ॥ ३ ॥ अमूर्त तो ॥ ४ ॥ सुद्ध तो ॥ ५ ॥ बुद्ध तो ॥ ६ ॥ नित्यमुक्त तो ॥ ७ ॥ निराभिमानु तो ॥ ८ ॥ पर तो ॥ ९ ॥ परिसाक्षित्व ऐसाही धर्मु तेथ नाहीं ॥ १० ॥ केवळ तो ॥ ११ ॥ केवळिचि नीत्यसंबंधें माया असे ॥ १२ ॥ तेथचि संबंध पातली असे तेथचि न पवे ॥ १३ ॥ ऐसीचि वस्तु ते ॥ १४ ॥ ऐस्वर्यादिकरुनि सकळै धर्म मायासंबंधेंचि तेथ ॥१५॥

॥ २२ ॥ सर्वात्मकु तो ॥ १ ॥ सर्वातीत तो ॥ २ ॥ सर्वकर्ता तो ॥ ३ ॥ सर्वसाक्षि तो ॥ ४ ॥ ऐसा परमेश्वरु एकु आतिः ऐसा तो श्रीचक्रधरु ॥ ५ ॥ एवं नीर्वचन संपूर्ण ॥

॥ २३ ॥ सृष्टीमध्यें परमेश्वरु अवतरति ॥ १ ॥ मनुष्यवेशधार्यें[1] होति ॥ २ ॥ मायावेशधार्य होति ॥ ३ ॥ मायापुरधार्य होति ॥ ४ ॥ मायानिर्मितं पुरं मायापुरं ॥ ५ ॥ माया घटाकारें आकारें वोते ॥ ६ ॥ नख चर्म रोमादिकरुनि सुध चैतन्यचि तें ॥ ७ ॥ मायापुरीं माण्सीं अभीमानु ॥ ८ ॥ ब्रह्मांडी शक्ति अधिन शक्तिव्यापारुः मायापुरी ईश्वराधिन शक्तिव्यापारु ॥ ९ ॥ मायापुरी इतरशक्तितुल्य माया ॥ १० ॥ ईश्वरीं संपूर्णा शक्तिः जीवीं अंशतां शक्ति ॥ ११ ॥

---

१–वेख–पू.प.;

॥ २४ ॥ ऐसिया मायापुरातें स्वीकारुनि कर्मभूमिस्तीतां मनुष्यदेहयुक्तां जीवां ज्ञानपर्यंत आपुला संबंधु देति ॥ १ ॥ एकां प्रेम संचरीति ॥ २ ॥ प्रेम बोलीजेः भक्ति बोलिजे ॥ ३ ॥ प्रेमसंचारमात्रें वीकारु वीकल्पु स्वभावो तीन्ही उछेदुनि जाति ॥ ४ ॥ भक्ताचें सकळै सन्निधानि चरितार्थ होए ॥ ५ ॥ भक्तांसि श्रीमूर्तिवरि साध्य-साधन-प्रतीति प्राप्य-प्रापकु-बोधु ॥ ६ ॥ साध्यसाधनाकारें आकारलें कर-चरण-वंत ब्रह्म हें ऐसी भक्तासि प्रतीति ॥ ७ ॥ भक्त वीयोगि नुरे ॥ ८ ॥ भक्तां नित्य संबंध ॥ ९ ॥

॥ २५ ॥ एकां जीवांप्रति परा गिरा करुनि परमेश्वरु आपुलें स्तित्व साधिति ॥ १ ॥ मग एक अनुसरतिः एक ननुसरति ॥ २ ॥ ननुसरति ते प्रमादिए बोलीजतिः तेया सृष्टि सुन्य होए ॥ ३ ॥ अनुसरलेयांचें आगांतुक कुंठेः अनारब्ध सुकेः प्रारब्धा भोगीं क्षयो ॥ ४ ॥ अनुसरलयासि कर्मसवा भोग नाहीः दैवसवा भोगु । ५ ॥ अनुसरलेयासि देवत्व त्रियंचत्व होणें नाहीं ॥ ६ ॥ ज्ञानियांसि श्रीमूर्तिवरि साधनप्रतितिः प्रापकबोधु ॥ ७ ॥ कैवल्यदाता हाः मोक्षदाता हाः ऐसी ज्ञानियासी प्रतिति ॥ ८ ॥

॥ २६ ॥ अनुसरुनि संनिधान करी यापरी योग्य होए तयासि परमेश्वरु सत्ताज्ञानदान करीति ॥ १ ॥ कव्हणि एकी अवसरी सकळही मळाचें परिसारण करुनि परमेश्वरु जीवीं आपुलि सत्ता संचरीतिः मग मागौते मळ घालीति ॥ २ ॥ सता बोलीजेः सच बोलीजेः अवीभचार्य ज्ञान बोलिजे ॥ ३ ॥ सता ते वीदित ॥ ४ ॥ सताज्ञान तेंचि अपरोक्षज्ञान ॥ ५ ॥ सताज्ञानि अशेष कर्म जाणेः कर्मक्षाळणि उपावो जाणेः येतें विघ्न जाणेः वीघ्ना उपशम जाणे ॥ ६ ॥ संनिधानि क्षाळी कां असन्यधानि क्षाळी ॥ ७ ॥ संनिधानि तोकडेनि बहुत क्षाळीः असनिधानि जें जेतुलेनि क्षाळावे ते तेतुलेनि क्षाळी ॥ ८ ॥ सत्ताज्ञानि वीकारसृष्टी कर्मसृष्टी अधीना होतिः दैव वीघ्न ॥ ९ ॥ ब्रह्मांदिक आपुलेया पदा नेवो पति परि तो तयांचि वास न पाहे ॥ १० ॥ अष्टभैरव आळ[1]वीति डंडळवीति परि तो जैसा कांही तैसाची ॥ ११ ॥ ब्रह्मतुल्य आनंदु विघ्नत्वें प्रकटति ॥ १२ ॥ विद्या अवीद्या पुरुषु यां तीहींतें विद्या प्रकाशीः मग तो वीद्ये आधिन होए ॥ १३ ॥

---

१ हालवीति;

॥ २७ ॥ यापरी योग्य होए तयासि परमेश्वरु सामान्य-ज्ञान-दान करीति ॥ १ ॥ सामान्यज्ञानि वीकार सृष्टिकर्मसृष्टि वेगळा होएः दैवसृष्टि अधिना होए ॥ २ ॥ सत्ता सामान्यज्ञान मिळौनि अशेष कर्मक्षाळण करीः अशेष मळक्षाळण करी ॥ ३ ॥ तेणें लावीलें ते तो फेडिः तेणें लावीले नाही ते तेयाचेनि न फिटे ॥ ४ ॥ यत् क्रिप्यते तत् कर्मः म्हणौनि कर्मशब्दें कर्म बोलिजेः कर्मशब्दें मळही बोलिजति ॥ ५ ॥

॥ २८ ॥ यापरी योग्य होए तयासि परमेश्वरु वीशेष-ज्ञान-दान करिति ॥ १ ॥ विशेषज्ञानी दैवसृष्टि वेगळा होएः सकळाही शक्ति अधिना होतिः अपरोक्षा होति ॥ २ ॥ माया कोपौनि उदासिन होए ॥ ३ ॥ मायाकृपाव्यतिरिक्त परमेश्वरु तयासि सकळाही शक्ती दान करीति ॥ ४ ॥ मग तो सकळासिही प्रमाणद्रव्य होए ॥ ५ ॥ अद्यमळयुक्त चरमदेहस्थित कृपास्पदीभूत होउनि असे ॥ ६ ॥

॥ २९ ॥ मग परमेश्वरु तयांचि कृपा करीति ॥ १ ॥ मग परमेश्वरु आपुलेया कृपा-शक्तीकरुनि

तयाचि अनादि अविद्या छेद करीतिः मुळाविद्या छेदु करीतिः अज्ञान छेदु करीति ॥ २ ॥ अज्ञानछेदें करुनि अन्यथाज्ञानत्रुटि होएः आद्यमळत्रुटि होएः जीवत्व त्रुटि होए ॥ ३ ॥ तळिल[1] हाणितलेयां वरिचील पडे उतरडि गडबडि ॥ ४ ॥ मग परमेश्वरु तयातें माया-पारंगता करिति ॥ ५ ॥

॥ ३० ॥ साध्याचीया प्राप्ति साधन निवर्तें ॥ १ ॥ परमेश्वरु भक्तासि आपुली अनुभूति देतिः रति देति ॥ २ ॥ भक्तासि आपणपें समोर देति ॥ ३ ॥ ज्ञानियां ब्रह्मीभूत करीति ॥ ४ ॥ ज्ञानियां पाठीसि घालिती ॥ ५ ॥ ज्ञानियांसि मोक्ष देति ॥ ६ ॥ ज्ञानियां ब्रह्मीं मिसळेः बुडि दे ॥ ७ ॥ भक्त भेदें अनुभवी कीं अभेदें अनुभवी ऐसे वीकल्प तेथ करूं न एति ॥ ८ ॥ या परि परमेश्वरु श्रीचक्रधरु जीवांतें उधरिति ॥ ९ ॥ एवं उद्धरण संपूर्ण ॥

॥ ३१ ॥ विकार-विकल्पु-शुन्य ॥ १ ॥ स्वभाव-मात्रें ॥ २ ॥ निरालंबी ॥ ३ ॥ देवता-स्मरणे ॥ ४ ॥

---

१ तळिचील,

॥ ३२ ॥ जो जन्म क्षेपी ॥ १ ॥

॥ ३३ ॥ तेयासि परमेश्वरु पुनरपि आपुला संबंधु देति ॥ १ ॥ एवं आस्तीपर संपुर्ण ॥

इतिश्री परधर्ममहामोक्षसाधने केशराजबासकृत लक्षणान्वय समाप्त



# टीपा

## पूर्वी-नामनिर्धार-पंचकृष्ण

[ "लक्षणस्थळांत" ( एकंदर १५+२०८=२२३ ) सूत्रें आहेत; त्यांपैकीं " पूर्वी, " " नामनिर्धार " आणि " पंचकृष्ण " हे पहिले तीन भाग प्रास्ताविक असून मुख्य निरूपणास " अन्यव्यावृत्ती " पासूनच प्रारंभ होतो. या पहिल्या तीन भागातील १५ सूत्रांवर भाष्यस्थलांत टीपा दिलेल्या नाहींत, आणि तेथे " अन्यव्यावृत्ती " पासूनच ग्रथास प्रारंभ केला आहे.

" पूर्वी " प्रकरणाचे ४ ' सरवळे ' असावेत असा समज दिसतो; पण हल्ली उपलब्ध असलेल्या प्रतीत ३ व ४ हे ' सरवळे ' नुसत्या फुल्या देऊन दाखविले आहेत; व तेथें तिसऱ्यांत चार आणि चवथ्यांत तीन अशी सात सूत्रें असावीत, आणि दोन्ही मिळून ' उद्धरणसंभूति ' व सृष्टिसंभूति ' यावर रचना असावी असा समज आहे. कित्येकांच्या मतें या फुल्या सृष्टीच्या घडामोडीचें सनातनत्व दाखविण्यासाठी निर्दिष्ट केल्या आहेत. " तेचि अनंता युगी युगानुरूप अनंत अवतारीं अनंता जीवांसि बोध देउनि करणीये करवीति। ए सप्रथक शब्दी अनतत्व सांघीतले असे । म्हणौनि अंक न मांडितीचि । यातव फुलीचि मांडिली असे "

प्रस्तुत प्रसिद्ध असलेल्या " पूर्वीत " ५ सूत्रें असून पहिल्या ' सरवळ्यांतील ' दोन सूत्रांत 'पूर्वकाळव्यवस्था ' व दुसऱ्यांतील तीन सूत्रांत ' उत्तरकाळव्यवस्था ' दिली आहे. " नामनिर्धारांत " ५ आणि " पंचकृष्णांत " ५ अशीं आणखी १० सूत्रें आहेत.

संस्कृतछाया--परमात्मनैकेन विना सृष्टौ न केनचिदपि करणेन जीवा मुञ्चन्ति ('मुच्यन्ते ? )। यद्यपि स निराकारः परं कृपापरतन्त्रः साकारः स्वात्मानं सृजति । तत्सन्निहिताश्च जीवास्तद्दास्येनैव मुच्यन्ति ( मुच्यन्ते ? ) ।

" श्रीचक्रधरें आपुलें व्यक्ताव्यक्त स्वरूप जाणावेया सकळ शास्त्राचें मूळ जें पूर्वी ते म्हाइभटांप्रति निरूपिली । " " प्रवृत्ति म्हणजे प्रथप्रथम कृपाळुवा परमेश्वरासि जीवोद्धरणहेतु सृष्टिरचनेची प्रवृत्ति उपनली । तयांत अवघेयातें प्रवृत्ति बोलिजे । " " अव्यक्तस्वरूप आनंदरूप शुद्धबुद्ध ऐसिए महन्त स्वरुपिं प्रवृत्तीचा उल्लेखु स्वयेंभ स्वतंत्रीय उपजे भंगे म्हणौनि प्रवृत्ति ।–" पू. प.

" या प्रकरणासि पूर्वीची कां म्हणितले । नाः आदि म्हाइभटांप्रति निरोपिली म्हणौनि । दुसरेः सकळशास्त्राचे बीज पूर्वी म्हणितले म्हणौनि पूर्वी । मा तर सकळशास्त्राचें बीज तें कैसें आसे पा । नाः पुरवीमध्यें बाराही प्रकरण साटति आसति म्हणौनि । तर तीएचि•कैसी पा । नाः सृष्टी ए पदी संसरण आन संहार ( २ ), मध्यें येथ आन्येव्यावृत्ती ( ३ ), कव्हणे करणे मुंचीजेना येथ युगधर्म आन विद्यामार्ग ( ५ ), एके परमेश्वरें वीण तोचि परमेश्वर नीरवेवो नीराकार येथ नीर्वचन ( ६ ), पर कृपावशें येथ महावाक्यें ( ७ ), सावेवो साकार होएः अवतरेः येथ उद्धरण ( ८ ), सन्निधान देः ते दास्येमोचक येथ आसतीपर ( ९ )––ऐसी प्रकरण नव । त्यांत आठ प्रकरण पाठ आन आर्थवचना सहीति वीचारस्थळ आर्थ । मग आसतीपर पाठ आन आर्थवचना सहीति आचारस्थळ आर्थ । ऐसी आकरा । आन दृष्टांत । विचारपर ते विचारीं मोडती आन आचारपर ते आचारीं मोडती । एवं बारावें प्रकरण मूर्तज्ञान । आठवा प्रकरणपरत्वें मूर्त म्हणितलें तर बारावें प्रकरण दृष्टान्त स्थळ । ऐसी ये बारा प्रकरणें मुद्रितार्थी पूर्वीमध्ये आसतीं । म्हणौनि सकळशास्त्राचें पूर्व म्हणौनि पूर्वी " लक्षणबंध.

हें प्रकरण श्रीचक्रधर डोमेग्रामीं असतांना त्यांच्या दर्शनास माहींभट्ट गेले असतां परस्पर वादविवाद होऊन अखेरीस चक्रधरांनीं नित्रेदन केलें आहे, असा ' प्रकरणवशांत ' उल्लेख आहे. ' पूर्वीच्या ' प्रसंगानें माहींभट्टास ईश्वरप्रतीति झाली त्याची हकीकत थोडक्यांत अशी आहे कीं, माहींभट्ट हे आपले सासरे गणपत आपयो यांच्यापाशीं पाच शास्त्रें पढून सहावें ' प्रभाकर शास्त्र ' शिकण्यास ' विद्यानगरीं ' तेलंगणांत गेले. तेथें " समग्र

शास्त्रें सांघीतली। आणिकही बहुत अभ्यास केला। तेणें गर्व आला। पाइं तृणाची वाकीः दिहा दिवटी" अशी मूर्ति गर्वानें 'कां हा एक सूर्य आकाशी आन भूतळीचिया पंडितावर मी माहींयाभट्ट ज्ञानसूर्य" अशी प्रौढी मिरवत "उभय गंगातीरी पंडिता नीरोत्तर करीति।." पुढें 'सराळें' येथें गणपति आपयांची भेट झाल्यावर उभयतांची चर्चा चालली असतां आपल्या तोलाचे विद्वान कोणी आसपास आहेत कीं काय याबद्दल ते चौकशी करूं लागले. प्रत्यक्ष सासऱ्याच्या विद्वतेबद्दल त्यांना फारसा आदर नव्हता. त्यांना ते "उभय गंगातटासी आळमाळ पानरट धरूं जाणती" असेंच लेखीत असत. त्यांस आपण डोमेग्रामी श्री चांगदेव गोसावी यांची भेट घ्यावी असें सुचविले. "तयाची जर भेट होइल तर तुमचिया वाचलियापणासि रूप होइल। माहीभट्टी म्हणितलेः काइ ते विद्वांस। काइ संस्कृत जाणत असत ?।" त्यावर आपयो म्हणाले "तै मी नेणें: पर मऱ्हाटी अनावर बोलत असत।" यावर माहींभट्टानी प्रश्न केला, "तर मज माहीयासी बोलती ?। तेंही म्हणितलें: बोलतील की न बोलतील हें नेणिजे।" यावर माहींभट्टाच्या आग्रहावरून जेव्हां आपयो देवगांवास (देवगिरी) राजकार्यास चालले तेव्हां समागमें त्यांना घेऊन गेले. वाटेंत माहींभट्ट आगामी वादविवादाचें मनन करीत होते; "वाटेसी माहिंभट्ट वादस्थळ आंवाकिति। ते ऐसें बोलेल तर ऐसा आक्षेप करीन। समग्र वादस्थळ आंवाकिलें।" वाटेंत 'भामाठाणास' वामनभट्ट पिंपळे हे डोमेग्रामीं जात होते त्यांची भेट झाली; आणि ते देखील गोसाव्यांच्या दर्शनास निघाले आहेत असे कळतांच, माहीं-भट्टास त्यांच्या स्वाधीन करून आपयो आपल्या कामास पुढें चालते झाले. हे दोघे डोमेग्रामीं पोहोंचले व मठांत गेले; तेथें त्या दिवशीं कोणी भक्तानें गोसावियांचा 'पूजावस्वर' केला होता; "गोसावियांचेया श्रीकंठीं गळदंडा ओळगविला होता। श्रीमुखी तांबोळः श्रीमुगुटी मुगुटमाळाः श्रीकरी बाहूभूषणें: कळीयाचे हातसरेः श्रीकरीं पुष्पेचा झेलाः टोपरें आंगीः मोकळेया पुष्पांची पूजाः सोनसळेचे प्रावर्णः ऐसी उधात दैवी श्रीमूर्त" आसनस्थ होती. तेथें "तव मायंभट्ट आलेः काया प्रणीत केले। मायंभट्टाचा गर्वपरिहार केला।

एतुलेनि उगेचि राहिले । मग गोसावी श्रीमुख केले। मग सर्वज्ञें म्हणितलें: आत्यंत संसृति–छेद होय ऐसी कांहीं प्रतीति आति । तर मायंभट्टी म्हणितलें: तर आपण कव्हणें कामा राहीजे ? । ऐसें प्रत्युत्तर दीधलें । ' हें ऐकतांच गोसावी चकित होऊन गेले; आणि जवळचे शिष्य माहींभट्टास निराकरूं लागले असतां चक्रधरांनी त्यांना थांबविले. ती मंडळी शांत झाल्यावर पुन्हा तोच प्रश्न त्यांनी केला. " माहीभट्टी म्हणितले: आति । सर्वज्ञें म्हणितलें: कैसी आति । यावर माहींभट्टी म्हणितले: कर्म कीजे: कर्मांतव शुद्ध आंतष्करण होए: शुद्ध अंतष्करणें ज्ञान होए: ज्ञानोदये मोक्ष । सर्वज्ञे म्हणितले: कर्मांत किती भेद असत । भट्टी म्हणितलें: षड्विध भेद उचीते ।यजन याजन आध्येयन आध्यापन दान प्रतिग्रह । सर्वज्ञे म्हणितले: एक नित्ये: एक निमित्येक । नीत्येक तीए प्रतीदिनीचेया परिहारार्थीं गेलीं का निमित्येक फळी गेलीं । मा के असे कर्म । मा काईसेनि होए ज्ञान । काईसेनि होए मोक्ष । एकी क्रिये दोन कार्यें हे आतीचि ना । " अशा उपक्रमाने मराठीत व " अवलीळांचि संस्कृत उच्चारिती" असा चार घटका वाद होऊन माहींभट्ट निरुत्तर झाले. तेव्हां पुनरपि पहिला प्रश्न केल्यावर " पूर्वी " प्रकरणास तोंड लागले. सर्वज्ञें म्हणितले: सृष्टीमध्यें कव्हणे करणे मुचीजेना एके परमेश्वरें विण । " या माहीभट्टी आरोप केला । " " जी जी: परमेश्वरु नीर्वेवो नीराकारु आसे " यावर गोसावी म्हणितलें । तो परकृपावशे सावेवो साकारु होए । अवतरे: आपुलें सान्निधान दे: तें दास्येमोचक ।" यावरि माहीभट्टी म्हणितले: जी जी: दास्ये कव्हणाचें करावे । सर्वज्ञे म्हणितले: जैसे द्वापारी श्रीकृष्ण चक्रवर्ति । माहीभट्टी म्हणितले: जी जी ते युगेंचि गेले आन आवतारे वीजें केले: तर दास्ये कव्हणाचें करावे । मग सर्वज्ञे म्हणितले: जैसे सह्याद्री श्रीदत्तात्रए प्रभु मायंभट्टीं म्हणितले: जी जी: ते अमोघदर्शन: दर्शन नव्हे ऐसा संदेह भाविला । यावरि सर्वज्ञें म्हणितलें: जैसें द्वारवतीए श्रीचांगदेवो राऊळ। माहींभट्टीं म्हणितले: जी जी: त्याहीं अवतार कामाख्या निमित्यें पुर त्यजीलें । तर दास्ये कव्हणाचे । यावरि सर्वज्ञे म्हणितले: जैसे रीधपुरीं श्री गुंडमराऊळ । माहींभट्टीं म्हणितलें: जी जी: ते वेडी पिसी मूर्ति । यावरि गोसावी जानू त्राहाटिले । सर्वज्ञें

म्हणितलें: जैसे प्रत्येष्ठानी हे । आन माहींभट्टा बोध--संक्रमण जाला: मो जीव हा परमेश्वरु ऐसी प्रतीति आली" यानंतर माहींभट्टास चक्रधरांनी उपदेश केला.]

१ " सृष्टी "-" सृष्टी म्हणजे सृजणेया वाचक । सृजन हे सृष्टी । तर काइ सृजीले । ना: जे होते तें । का ना: सृजैली म्हणितली म्हणौनि "

" मध्ये "-" मध्ये म्हणजे देवतांचेया स्वरूपामध्ये उतरत कर्मभूमि । " " ब्रह्मांडपरत्वे जे जे कर्मभूमि तो तोचि मध्य बोलिजे । कां जे तिए वांचौनि आणिके भूमिसि साध्यप्रापके साधनें कव्हणींचि न वर्तेति म्हणौनि । कर्मभूमि शब्दें तमास्तित मनुष्यत्व तेंही लाभे । कां जे तेयावांचौन आणिके देहीं कर्मनिष्पत्ति असेचिना "

" कव्हणें करणें "-सकळ देवतांचे आंतर्याग बहीर्याग भावक्रिया तथा उपाए साधनें तेंही । तर तींएचि कव्हणें । ना " नानापुण्यें अनंतें नगणित सुकृतें देवता तेंहि तोषे । " ऐसी गद्यकारें बोलिलीं असत । इत्यादि परीचीं अनेके विचित्रें करणें: तेंहि । "

" मुचिजेना " -" अविद्यादी बंधापासौनि सुटिजेना । तेही समस्तीं करणीं बांधली गाइचेनि दृष्टान्ते संसारबंध आधिके अधीक दृढतर होए.

' ऐसा चैतन्यादि सकळ देवतांची साध्य साधनासहित व्यावृत्ति करौनि ईश्वराचेया संनिधान-दास्या-वांचौनि मुंचन नव्हे तें सांघीतले "

" एकें परमेश्वरें वीण "--" दुसरा असेचिना " " अव्यक्त परमेश्वर तो एकचि असे । पर अव्यक्ति व्यापार नाहीं म्हणौनि तयाचेनि संसारबंधापासौनि मुंचन नव्हे यातव तोचि कृपावशें सावेवो साकारु होए " " परमेश्वरु म्हणजे परमें ऐश्वर्यें आथिला आन सकळांसि पर म्हणौनि परमेश्वरु । "

वीण--" देवता अभिमुखा: तोखलेया फळ देति । रुसलेया दुःख संपादीति म्हणौनि । वीन म्हणजे तथाहुनि आणिक समर्थ नाहीं तोचि परमेश्वरु ।"

" तथा साकार अवताराचे अपार भेद असति । तेचि ब्रह्मांडपरत्वें देव-मनुष्य-तिर्यंच-परदृश्य-अवरदृश्य-परावरदृश्य-ऐसे अनंत अवतार असति ।

तयामध्ये एकें परमेश्वरे वीण म्हणितलेया जयासि परम ऐश्वर्यें जीवोद्धरणाचेंचि व्यसन असे तया एका उभएदृश्यावांचौनि सर्वथा मुचिजेना म्हणौनि एकें परमेश्वरें वीण म्हणितलें । पू० प०

[ " दैवसंपत्ती परमेश्वर न पवीजे । पुत्रसंपत्ती परमेश्वर न पवीजे । सुहृदसंपत्ती परमेश्वर न पवीजे । विद्यासंपत्ती परमेश्वर न पवीजे । हें सकळही परित्यजुनि सर्वभावी अनन्य होऔनि परमेश्वरा शरण रिगीजे । तेणें परमेश्वर पावीजे । "—शो. वि. मा. सर. ३२९-८-९ ]

२ "नीर्वेव "–" नीरवएव म्हणजे आगाध स्वरूपः अव्यक्तः आणि अवएव नाही म्हणौनि नीर्वेव । " " निर्गत आवएव कां जेयापासावः एवं हस्तपादादिकांची कव्हणीचि आकृति नाही कां जेयासि तयातें नीर्वेव बोलीजे । म्हणौनि शब्दें दाहा च्यारि चौदा इंद्रिए तयासि नाहीति ऐसे सांघीतलें । " पू. प.

" नीराकारु "– " आकृति नाही । कां पाः तो अनंत कीं: तें स्वरुप अनंतधा म्हणौनि आकार नाहीं । शुद्धबुद्ध आनंदरूप म्हणौनि ।

३ " कृपावशें—" " ज्ञान देयावें: प्रेम देयावें: ·म्हणौनि कृपावशें म्हणजे अभिनवसु ( अभिनिवेश–आग्रह ) । जैसे कोण्ही एका समर्थाचें माणुस बांधवडी पडीले असेः तयासि अभिनवसु भरेः तैसा हा जीव नाना दुःखें भोगीत असे ते देखवेना । कां पा । तो कृपाळु । तर ईश्वर आपुला स्वरूपी आपुला रमतिः तर केवि देखति । नाःतेथ अखंड ज्ञाने आणि बंधः म्हणौनि कृपा महंत स्वीकरिली । "–पू. प.

" जें निर्विकार आनंदरूपा ईश्वरासि प्रवृत्ति उपजे हें कृपाचि करित असे । जे सृष्टी रचावीः अवतारु स्वीकारावाः जीव उद्धरावेः हे कृपाचि करीत असे । म्हणौनि कृपाचि करुनि अनंता अवतारीं अवतरत असती । मग अनंता जीवांते उधरीत असति । जैसे नदीसि महापूर एः मग दोनी थडियांते पाणी सांडौनि जाएः तेणें दरें दरकुटे वोहळ खोहळ थीलरें उदकां भरति । तें उदक जीवांसि पीयावेया होए । तैसें प्रथम कृपेचा पुर स्वरूपासि आला ।मग ते कृपा

स्वरूपी झळंबौनि नाना अवतारी साटवीलि । मग तेणें सकळ जीव जीयाले । म्हणौनि कृपावशें अनंता अवतारी अनंता वेखी जीवा उधरीताति ।"–म.वा.प्र.

५ " दास्ये "–दास्य म्हणजे चर्या । मोचक म्हणजे आंतीक प्राप्ति करीति ।

" एवं नीर्वेवो नीराकारु असे तोचि कृपावशें सावेवो साकारु होए म्हणितलेया अनंत देवता अनंता वेशी अनंता वेसनी अनंत जीवांसि अनंता परीचि दानें देति । पर मुख्य उद्धरण तें ज्ञानक्रमावांचौनि नाहीं । कांजे तया दोहीं साधनी करुनि जे दास्य घडे तेणें संसारबंधापासौनि मुचिजे ! "––पू० ५०

## नामनिर्धार

१ " श्रीकृष्णचक्रवर्ति––" " क्षत्रियांचेया कुळीं यादवाचेया वंशीं वसुदेवापासौनि देवकीचिया गर्भी उभयदृश्यावतार स्वीकरिला । पूर्वी श्रीकृष्णचक्रवर्ती विज्ञानशक्ती खेळिन्नले पाठी ज्ञानशक्ती स्वीकारिले । द्वारावतीए अवस्थान: चक्रवर्तिवेशे क्रीडा: ऐसी उपाधि स्वीकारिले । अनंत पोवाडे केले: अनंत जीवांतें ऊधरीले । "

२ " श्रीदत्तात्रेयो प्रभु––" " जैसे त्रेती भोगभूमी ऋषिवंशी आनुसयेच्या गर्भी उभयदृश्यावतार स्वीकरिला । "

३ " द्वारावतीए श्रीचांगदेवो राउळ––" फलेठाणीं स्त्री–आग्रह–निमित्यें करौनि मातापुरा सिंहाद्रीसि बीजे केलें ।- तेथ श्रीदत्तात्रेयप्रभूचि प्रउर्ती आदिकारण । व्याघ्रवेशें भेट । श्रीचांगदेवो राउळ गर्भीचा अवतार । जीवांते दवडौनि अवरदृश्यावतार स्वीकरिले । पर आच्छादिले । द्वारावतीए आवस्थान: अवधूतवेशें क्रीडा: बावनपुरुषां विद्यादान: "

४ "श्रीगुंडम राउळ––" रिधपुर प्रांती नांदगावां माझारी खेड नांवें गव्हाण असे । तेथ काणणवशाखें श्रीप्रभु आवतार स्वीकरिला । संन्यासवेशें द्वारावतीए गमन । तेथ चांगदेवो राउळ गोमतीएं क्रीडतां भेटति । द्वितीए कारण ।

जो ‘ महावाक्यी ’ शक्तियुक्त सांघीतला परमेश्वरः तोचि मग ‘ नीर्वचनी ’ तिन्हीं अंश वेगळे करौनि निर्वेचिला । तोचि कैसा । नाः ब्रम्ह माया याचि व्यावृत्ति करूनि केवळा आनंदा स्वरुपाचा निर्वचु केलाः ऐसा जो परमेश्वर त्याचें । ‘ गोसावी ’ म्हणजे जीवविताः प्रतिपाळीताः पोशीता तारीता म्हणौनि गोसावी । तोचि जीवदेवतांचा स्वामी । तोचि सृष्टिसंहार करीता । तोचि जीवोद्धरणव्यसनीया । तोचि विरुद्ध धर्मीयाः तोचि अनंत अवतारी अवतरे । ऐसा कृपावंत परमेश्वरु । त्या गोसावीयांचे चरण म्हणजे श्रीमुगुटापासौनि चरणपर्यंत मूर्ती कवळली । चरण म्हणजे सकळ तीर्थांचें जन्मस्थानः सकळ देवतांचें पुण्यःवंद्यः जें ज्ञानिया भक्तांचे धैर्येः तेया चरण शरण म्हणजे रक्षण । तर कवणासि रक्षणे । नाः अनुसरौनि हीनोत्तमभागें स्मरणेसी जे जन्म अर्पीति तयासी असे । तयासी तोचि साध्य तोचि साधन । तयासी विरप-न्नता जीवा आनंदाची प्राप्ती होए । ”–नामाचे व्याख्यान.

## १ आन्येव्यावृत्ति

[ हे पहिलें प्रकरण असून त्यांत ३ ‘सरवळे’ आणि १० सूत्रें आहेत. पहिल्या सरवळ्यांत ४ सूत्रे असून त्यांत ‘स्वर्गव्यावृत्ति’ केली आहे; दुसऱ्या-मध्यें ५ सूत्रें असून त्यांत ‘मोक्षव्यावृत्ति’ साधली आहे. शेवटच्या सरवळ्यांत १ सूत्र असून त्यांत ‘अच्युतपदप्रतिष्ठा’ केली आहे. या प्रकरणांत ईश्वरापा-सून इतर देवतादिक ‘वर्जित’ म्हणजे वेगळ्या ( पृथक् ) केल्या आहेत. “ एथ देवता सांघौनि ईश्वरू सांघीतला असे ।” म. वा. प्र. ]

“ कर्मभूमीचिया देवता—” “ दक्षिणीचेया सेतुबंधा उत्तरेः उत्तरेचेया हीमाचलासि दक्षीणेः पूर्वेचीया वोडीसेया जगन्नाथासि पसीमेः पसीमिली द्वारके पुर्वेः वाव्यकोनीचिया सोरटी सोमनाथा पूर्वेः मध्यें पाचशते कर्मभूमि असे ।”—अन्यव्यावृत्ति सरवळे.

“ ऐसेया कर्मभूमीचा मध्यप्रदेशी ( देवता ) राहण घालीति । पोटळिया सोडीति । ऐसा पाचाशता आंतु जें जें वर्ते तें तैसा घेति । लोकांची नवसिये परविती । यापरी नाडुनि खातिः म्हणौनि देवता नष्टा बोलिजेति ।”

" तीर्थःदेवताः पुरुषः ये तिन्हीं आपलवीति ।--आ. पा.

" देसोदेसीचीं भोगस्थानें अथवा नगरें पुरे पाटणींचिया कां ग्रामोग्रामीचीया अथवा वाटोवाटेंचीया कां तीर्थातीर्थीचीया अथवा घरोघरींचीया कां रानोवनीचींया ऐसीया काष्टपाषाणीचीया मृत्तिके आधार जितुकीं क्षेत्रें दीसती तितुकीया "

" येथचिया राहिलेला देवते आपणिया खालुते ऐश्वर्य असेः परौते नाहीं। कर्मभूमीचिया देवता स्वरुपाचा उचनीच विभाग नेणिजे । "–भाष्य.

" देवतांसी जीवासारिखे सृजणे न लगे । ईश्वरप्रकृति जाणौनि तियां अवतरोंचि लागेति । " सं. प्र.

" देवता थोरु सामर्थ्यवंता : ईश्वरासमान । जे ईश्वरीए दोनी साधनें तैसें तेयातेंही असती । तीं आंतर्याग बहीर्याग । ईश्वरीं ज्ञानसुखसामर्थ्यें प्रकाशु असे : आन तेयांचाही ठाइं इतुकें असे । " म. वा. प्र.

२ " आष्टौ देवयोनी "–" एरा देवतेचिया स्थानांचे नांव घेतले पर आष्टौ देवयोनीही एकस्थान सांधीतलें नाही । ईश्वर आपणीयातें नेति ना : पर कृपा नेमीले । यथा ब्राह्मणाते ब्राह्मण नेमी । " भाष्य.

४ " स्वर्ग "–" स्वर्ग हे स्थाना नांवः एरव्ही मनुष्यदेहा वरुतें कर्मभूमिपासौनि तो ठाववेन्हि स्वर्गचि । ते फळावाचक । " भाष्य.

६ " क्षीराब्धि " --" गांवा नांव क्षीराब्ध । जैसा ढोर समुद्रः तेथें काइं ढोरें असत । " " क्षीराब्धी अविक्रये ब्रह्म " म्हणौनि तेथ अवतारु नाहीं । "

" अष्टभैरव "--" अष्ट म्हणजे आठचि । परिवार नाहीं । एक स्थान भूम आसे । पर ठाई ठेले नव्हति । चंचलता : सर्वेचि ऐन्हा सर्वेचि पैन्हा। भैरव म्हणिएति अहंकार–ऊर्मि बाहुल्ये "–भाष्य

" सृष्टिकर्ते ते : अहंकार्ये तेः अभीमानिए तेः"–– विचारपाठ.

" आष्टभैरवाचा ठाइं पाच भूतः तीन गुणः"---विचारमाला.

" आष्टभैरवाच्या ठाइं दिक्दिशा काळ लोक नाहीं " वि. मा.

" चैतन्यापर "–"चैतन्या पर-ब्रह्म-ईश्वर होए। परि परमत्वें म्हणौ नै ए ।"

" परमेश्वर--" " चैतन्यापर परमेश्वर म्हणितला । ब्रह्मांसि कां न म्हणतीचि । नाः मान्यता भंगैल । कां ते वडील वृद्धः आगाध । आपणयासि मानिती थोरपणें । पर उद्धरण नाही. निर्गुण म्हणौनि । "

" श्रीचक्रधर "--" ज्ञानचक्र शक्तिचक्र धरिलें म्हणौनि श्रीचक्रधर "

" रक्षता "--" दुःखा वेगळा करीता "

" उधरीता "--" सकळ देवता उंच करौनि मोक्षा देता "

" हो "--" भट्ट ऐसें आशंसीत असत । "

[ नित्यवर्गात देवता अंतर्भूत होतात. त्यांचीं स्वरुपे भिन्न भिन्न परिमाणाचीं आहेत. कर्मभूमीच्या प्रत्येक देवतेचे स्वरूप ५०० योजने असून प्रत्येक वर्गातील देवतेचे स्वरूप दसपटीने वाढत वाढत शेवटच्या वर्गातील म्हणजे ' विश्वरूपदेवतेचे ' पांच अब्ज योजनें मानले आहे. यानंतरची देवता " चैतन्य." तिचें स्वरुप अनंत म्हणजे अपरिमित आहे. या ब्रह्मांडस्थ देवता परमेश्वराच्या उल्लेखानुरूप साकार होऊन जीवांस शुभाशुभकर्मानुसारे स्वर्गनरकादि फळे भोगवितात. या साऱ्या देवतांचा अणुरेणु विभाग प्रत्येक देहधारी जीवामध्यें असतो. देवता ' पिंडस्थ ' असतात. मात्र 'पिंडस्थ' साकार नसतें, अगर तें ' पिंडस्थ ' ही नसते. या देवतेचीं स्थानपरत्वें संख्या पुढें दिल्याप्रमाणें आहे. कर्मभूमि १३ कोटी, अष्टौदेवयोनी १३ कोटी, अंतराल्य १३कोटी, स्वर्ग ३३कोटी, कैलास-वैकुंठ-सत्यलोक ९ कोटी,क्षीराब्धि १। लक्ष, अष्टभैरव ८, विश्व १, आणि चैतन्य १, एकूण संख्या ( ८१,०१,२५,०१०)

[ " मनाधिष्ठात्रीदेवता ब्रह्मा । बुध्याधिष्ठात्री देवता शेषशय्या । चित्ताधिष्ठात्री देवता विष्णु । अहंकाराधिष्टत्री देवता महादेव । चक्षुरधिष्ठात्री देवतासूर्य । " " जो जेतुला तो तेतुलियातें करूं शके । "-वि. मा. " उंच असे तो तळचील देखे: पैल ऐलातें व्यापुनि वर्ते । ऐल पैलाचें अस्तित्व जाणे । नित्यबद्धा देवताः बंधमुक्त जीवः नित्यमुक्त परमेश्वरः " वि. पा. " जीव जें व्हावें तेचि होएः देवता होऊं जाणेः उरूं जाणेः देवतेस लीळाविग्रहधार्येत्व आति । देवता आड रिगून फळातें दे । "--वि. पा.

" जीव आर्जकः देवता फळदार्ती "––वि. पा.

" वरिलीचिया इच्छाः तळिलीचा व्यापार । देवताः एकी उंचा एकी नीचाः पैल आठ ऐल तीन समानचि । देवता एकी राजसाः एकी तामसाः देवतेस क्षेदआल्हाद आत । देवतेसि कर्मलेपाचें ज्ञान आत । देवतेसि आपणाखालुते आपरोक्ष । देवतेचे मळाधार ज्ञान । देवतेचा जैसा वर्ण जैसीं वस्त्रे जेतुल्या भुज्या जैसीं आयुधे तैसी प्रकाशे । पालापाणी आति तंव आभिमान आति ।"––वि. मा. " जीव देवता सापेक्षाः परमेश्वरु निरापेक्षु । जीव देवता साभिमानियाः परमेश्वरु निराभिमानु । जीव भजक देवता भज्या ।"––वि. मा.]

' प्रकरणवशा ' मध्यें ' आन्येव्यावृत्ति ' तीन चार प्रसंगीं सांगितली असा उल्लेख आहे " आभाळ आलेः वायो· सूटलाः यावरि माहींभट्टीं म्हणितलेः तत किं वश्ये ।" या प्रश्नावरून सर्वज्ञानीं ' अन्यव्यावृत्ति' निरूपिली. 'लक्षणबंधा' मध्ये या प्रसंगीं " रुभणिया "चा दृष्टांतहि सांगितला असा उल्लेख आहे.

" एकेकाचा विश्वास मानुनि अन्यथाज्ञाने परमेश्वरदास्य म्हणौनि जीव देवतांचे दास्य करीति । पर ते नव्हेः आन ईश्वर निरोपितां न घेति । जैसा 'रुभणियाचा' ( वांकडा कोयता ) दृष्टांत ।"––लापणिका.

तो दृष्टांत येणे ,प्रमाणें:––' कव्हणी एक जात्येंधाचेया पितियादेखतां दुधाचे गुण विशेष अनुमोदीत होता । तेथें जात्येंध बैसला होता. तेणे पुसिलेः आगाः दूध तें कैसेंः तो म्हणे दूध तें पांढरें । पांढरें तें कैसेः पांढरें तें बळै सारखें । बळै ते कैसी । बळै ते रुभणिया सारिखी । रुभणें ते कैसे । रुभणे ते ऐसें । म्हणौनि तेणे जात्येंधाचा हात वांकुडा करौनि दाखवीला । मग तेणे रुभणें तेंचि दूध ऐसे परिसिले । एके दिवशी तेणें कोठां रुभणे स्पर्शिले । ते मनिं देखिलें । तथा आंगणीं देखिलें । हात वांकुडा करौनि पाहिले । दूध तें हेंचि म्हणौनि आग्रहें पीओ लागला । तवं कांहीं न निघे । म्हणौनि हिरडीयांसि बळेंचि घासी । तेणे हिरडे फुटति । अशुद्ध निघे ते पिएः तंव कव्हणी एक देखौनि म्हणेः आरे हें काइं करितोसि । तो म्हणेः हें दूध पीताए । आरे सांडी सांडीः हें रुभणें । तो म्हणेः हें माझेनि बापे मज सांघीतलें । दुःख होए पर तो न संडी । "

## २ युगधर्म

[ या प्रकरणांत ६ सरवळे आणि ३० सूत्रें आहेत. पहिल्या ४ सरवळ्यांत अनुक्रमें कृत-त्रेत-द्वापार-कलि अशी ' युगव्यवस्था' सांगून, पांचव्यांत ' युगायुष्यव्यवस्था ', आणि शेवटल्यांत ' परधर्मप्रतिष्ठा ' सांगितली आहे. कृतयुगांत चैतन्य-माया, त्रेतीं हरि-हर-ब्रह्मा, द्वापारीं स्वर्गदेवता, आणि कलि-युगांत अंतरालय आष्टौदेवयोनी आणि कर्मभूमीचिया देवता अशा प्रकारें प्रत्येक युगाच्या अधिष्ठात्री देवता आहेत. ]

" युगधर्म "-- " धर्म आन कर्मभूमीचा योग म्हणौनि " " जव ते युग तव हाचि धर्म । धरिला म्हणौनि धर्मे: आणिका धर्मीचा संचार जीवा हो नेदि । आन उत्तम फळातें साधी । " " युग म्हणजे भूमी आन मनुष्यें काळ सरे तव "-भाष्य.

२ " आत्मोपास्ति"-( आत्मा+उपास्ति )=चैतन्योपास्ति । ' 'चैतन्य उपास्ती कां । तेथ आनंद थोर आन तेथ उपभोगत्वें देहेंचि द्रव्यें । " "उपास्ती म्हणजे उपजवळीकः म्हणजे उपासणें ।" " आत्मा म्हणजे लिंगदेह चैतन्यादिक भेदत्वें देखे तो ।

३ भक्ती अधर्म-" भक्ती म्हणजे ध्यानरूपसेवालक्षण । अधर्म म्हणजे धर्म नव्हे तोः वांचौनि पापरूप नव्हे: हीने देवताचा धर्म उत्तमें काळीं घडला तो अधर्म जालाः फळ अंतरलें ।

४ " फळ "--" फळ म्हणजे सुखानुभव "

५ " खालिली"--" अधर्मे खालील युगीचें मनुष्यदेह लाभे । कां जे असंत क्रिया तर नव्हे पर कष्टव्यतिरिक्तें घडली आन केली क्रिया वाया न वचे म्हणौनि ।" " युगाविपरीत धर्मानुष्ठानवंता कृतयुगीं जन्म " " कृतयुगीं द्वद्वा-वस्थानः आंतीं विकार। तिए युगीं मनोद्वद्वें आति । पर देहद्वंद्वें नाहिं ।"-वि. पा. " कृते सर्वे मनुजा आत्मारामाः । त्रेतायां मनोरामाः । द्वापर इंद्रिय-रामाः । कलौ च विषयारामाः । "--संस्कृतछाया वि. पा.

७ " त्रेतीं "--" त्रेत म्हणजे तिन्ही देवतांचीं ( ब्रह्मा--विष्णु--महेश )

" भक्ति हा धर्म "--" भक्ती म्हणजे भजनलक्षण। शोडसोपचारीं पूजा। मातापीतेयाची उत्तमः गुरूची मध्यमः बंधूची कनीएस।"

" तीर्थ-क्षेत्र-व्रत-दान "--" देवता अधिष्ठान जें उदकीं तें तीर्थ। क्षेत्र म्हणजे जो पाला-पाणी पडे तवं। व्रत म्हणजे अदृष्टबुद्धीं जे नेमणें। एकादशी शिवरात्र।" " दान म्हणजे उपकार निरापेक्ष स्वसत्तानिवृत्तिः परसत्ता संपादणें।" " वाराणसी पैठणासमानत्वें भूमीचेनि पवित्रपणें देवता अधिष्ठान तें तीर्थ मुख्यः एर अनुसंगिक। एकवीरा ( माहूर ) मल्लिनाथ क्षेत्र।"

[ " कलीयुगीं विद्यावंत नाहीं. कलीयुगीं आगम न वर्तति। इतर पंथीं तंत्रशेष वर्ते। कलीयुगीं विखो आति पर विषया नाहीं।" " कलीयुगीं तस्करत्व पुंश्चलत्व हा धर्म स्वरूपीं न वर्ते ऐसा विरळा।" " कलीयुगीं जन्ममात्रें चौकडीपर्यंत नरक। युगाविपरीत धर्मानुष्ठान घडे तर चौकडी चूके।" –वि. पा. " चहु युगीं हिंसा अधर्म। सकळहीं साधनें तिहीं युगीं वर्तति।"--वि. पा. ]

# ३ विद्यामार्ग

[ या प्रकरणांत २२ सूत्रे आणि ४ सरवळे आहेत. पहिल्या दोन सरवळ्यांत १० सूत्रांमध्यें विद्यांची संख्या व अभिधानें दिलीं आहेत; आणि तिसऱ्या सरवळ्यांत ६ सूत्रांत ' मार्गवेध ' अथवा उपासनासाधनें; आणि शेवटल्या सरवळ्यांत ६ सूत्रांत साध्यप्राप्ति सांगितली आहे. ज्या साधनांच्या द्वारें युगधर्म प्रकरणांत देवताप्राप्ति होते असें म्हटलें आहे तीं ' बहिर्यज्ञ ' साधनें असून त्यांचा व्यापार बाह्यपदार्थद्वारां होतो. परंतु दुसरीं जीं ' अन्तर्यज्ञ ' साधने तीं देहांतर्गत सामर्थ्यद्वारां व्यापार करितात. बहिर्यज्ञसाधनामुळें साधकाच्या शरीरांत कोणतेंही सामर्थ्य अगर सिद्धि प्राप्त होत नसून तें अंतर्यज्ञसाधनानें प्राप्त होतें; म्हणून या प्रकरणांत ' विद्यासाधन ' असें अन्य अभिधान दिलें आहे; व विद्या शब्दाचा अभिप्रेतार्थही तोच आहे.

विद्येची संख्या, नामे, देवता, संचारस्थानें आणि प्राप्ति यांचें स्पष्टीकरण खालील कोष्टकांत केलें आहे.

| विद्यानाम | विद्यासंख्या | विद्यादेवता | वेधसंचारस्थान | प्राप्ति |
|---|---|---|---|---|
| १ ब्रह्मविद्या | १ | ईश्वर | केवळाधारवेध | कैवल्यप्राप्ति. तत्त्वसाक्षात्कारिणी आत्मारामा: जीवा: |
| २ शांभवविद्या | २ { शुद्ध<br>समळ | चैतन्य<br>विश्वेदेवता | ...विदेहाधारवेध<br>. .देहाधारवेध | विदेह ( चैतन्यमाया ) प्राप्ति; चराचर-विश्वसंचार. देह ( विश्वेदेवता ) प्राप्ति; आत्मारामा: जीवा: |
| ३ शाक्तयविद्या | ८ | अष्टभैरव | अंत:करणाधारवेध | अन्त:करण ( भैरव ) प्राप्ति; मनो-रामा: जीवा: |
| ४ महाण्णवविद्या | १,२५,००९ | शेषशय्या–ब्रह्मा-विष्णु–महेश | इंद्रियाधारवेध | क्षीराब्धि–सत्य–वैकुंठ–कैलासप्राप्ति; इंद्रियारामा:जीवा:; सूक्ष्मशक्तिद्वारें दृष्टि. |
| ५ आण्णव | ७२,००,००,००० | १ स्वर्गीच्या इंद्रादि देवता<br>२ अंतराळस्थ गणगंधर्व<br>३ अष्टौदेवयोनी<br>४ कर्मभूमीच्या यक्षादिदेवता. | विषयाधारवेध | १ स्वर्ग<br>२ अंतराळ<br>३ कर्मभूमि } प्राप्ति;विषयारामा: जीवा:<br><br>विषयरूप पदार्थसेवन: स्थूलप्रपंचपर माणुद्वारें दृष्टि. |

सृष्टीच्या आरंभीं देवतादृष्टीस जीव गोचर व्हावा म्हणून त्यास प्रत्येक देवतेचा मळ लागला असतो; आणि जेव्हां तो मळ त्या त्या देवतेच्या वर्णादिकासदृश होतो तेव्हां त्या जीवास विषय--इंद्रिय--अंतःकरण--देह--विदेह--केवळ-अशीं नामें प्राप्त होतात. कारण ते जीव देखील त्या त्या देवतांचे 'मळ' आहेत. जेव्हां विद्यासाधने देतात तेव्हां देवता त्या जीवास त्याच्या शुद्ध व सूक्ष्म अशा स्वरूपांत पाहूं शकत नाहींत; पण जीवांतील स्वविषयक मळास पाहून त्यालाच जीव मानितात आणि तदाधारें जीवांच्या ठायीं विद्येचा संचार होतो आणि साधक जीवाच्या शरीरांत मेद मांसरूपी असलेल्या पिंडस्थ देवता प्रकाशित होतात. नंतर जीव त्या पिंडस्थ देवतेचें ध्यान करितो आणि त्यामुळे त्याला ब्रह्मांडस्थ देवतेची प्राप्ति होते.

'इंद्रिय' स्थानांतील चार देवता ( शेषशय्या--ब्रह्मा--विष्णु--महेश ) आपापल्या 'इंद्रिय' नामक मळाधारे जीवास 'विद्यासाधन' देतात; पण 'चैतन्यमायेस' देहधारण करणें नसल्यामुळें 'आदिमलाच्या' आधारें ती 'विद्यासाधन' देते.

कोष्टकांतील चौथ्या स्तंभांतील अभिधाने त्या त्या देवतेच्या स्थानांच्या सांकेतिक अर्थांनीं उपयोजिलीं आहेत आणि तें अभिधान जसें ब्रह्मांडस्थ देवतांचे वाचक आहे तसेच ते पिंडस्थ देवतांचेही वाचक आहे हें उघड आहे.

" विखो इंद्रादिकांतें म्हणितला । इंद्रिये ब्रम्हादिका सेखसय्यातें म्हणितलें । अंतःकरण अष्टभैरवांतें म्हणितलें । देह सिधेतें म्हणितले । वीदेह चैतन्यातें म्हणितलें । म्हणौनि हे पांच थोवे चेतनाशक्तीचे सकळ 'अर्थांशीं असती ।"
--म. वा. प्र.

[ " ब्रह्मविद्ये सकळही विद्या अनुसंगीकाः रिद्धीत्वे प्रकटति कां विघ्नत्वें प्रकटति । "-वि. मा. " चैतन्यासि चैतन्यविद्याः जीवासि ब्रह्मविद्या । सकळही विद्या चैतन्यादिभावेंः ब्रह्मविद्या जीवादिभावेः"-वि. मा. " येणें ( ईश्वरबोधें )

बोधवंता जे स्वस्तता ( स्वस्थता ) आति ते चैतन्यविषे विद्यावंता नाहीं "।–वि. पा.

" मोक्षमार्गीं जीवाचे मळ जातिः विद्यामार्गीं आच्छादति ।"–वि.पा. " चैतन्यविद्या आदिकरुनि सकळही विद्या अपरा अमोचका बोलिजेति। चैतन्या पर परमेश्वर पाविजे तें अच्युतपद "।–वि. पा. " शांकरी ब्रह्मियाचीः शांभवी महादेवाचीः शुद्ध विष्णूचीः वेधवंती शेषशय्याची । आशेष पिंडीं येथें विश्वेची प्राप्ति ।"–वि. पा. " एक समळ शांभवः एक शुद्ध शांभव । समळ शांभव ते विश्वेची विद्याः शुद्ध शांभव ते चैतन्याची विद्या । "–वि. मा. " शांभवीं साध्ये प्रतीति " !–वि. मा. " शांभवीचा रश्मी होए तर सकळही आत्मत्वें देखे । "–वि. पा. " देहविषे देह प्रकाशेः देहीं भूतें तन्मात्रापर्यंत उरतिः सातही अंश झडतिः एकाकार वृत्ति उरेः हेमकाया होएः वज्रकाया होए।"–वि. पा. " एक पुरुषीं विद्या ( देहविद्या ) ते : रिद्धी सिद्धी होतिः भूतापर्यंत गमन-दर्शन ।–" वि. मा. " विद्यावंत पुरुष होए तर सृष्टिसंहार करिता समर्थ नव्हे ।" वि. मा. " शाक्तेया साध्ये-साधक ऐशी द्वीध प्रतीति । "–वि. पा. " आाणवीं साध्ये-साधन-साधक ऐशी त्रीवीधि प्रतीति ।' –वि. पा. " इंद्रादिकां अनात्मा आत्मप्रतीति । ब्रह्मादिकां आत्मा आत्मप्रतीति । " वि. पा. " स्वर्गीं इंद्रादिकांचा ठाइं विषय मानसीकविखो । "–– वि. मा. " साधनीं दुःखरूपताः साध्यीं सुखरूपताः तो बहिर्याग बोलीजे । साध्यसाधनीं सुखरुपता तो आंतर्याग बोलीजे । "––वि. मा. "उभयान्वीक्षमाणे सत्तासंनिधमात्रें शक्ती संचरे यातें आंतर्याग बोलीजे । "–वि. पा. " वसिष्ठ आण्णवीचीए प्रथम करणीची रीगवणी जाणेः तयातव देहेद्वन्द्वें नीवर्तिली पर मनोद्वंद्वें न नीवर्ततीचि । " ––वि. पा. ]

## ४ संहारण

[" संहारण " हें चवथें प्रकरण असून त्यांत दोन सरवळे मिळून १५ सूत्रें आहेत. पहिल्या सरवळ्याच्या ८ सूत्रांत ' अनित्यवर्ग ' सांगितला असून दुसऱ्या सात सूत्रांत ' नित्यानित्य ' वर्गाचें निरूपण केलें आहे. अनादि

कालापासून अविद्यायुक्त जीव मायास्वरूपांत 'समुद्रीं जलचरवत्' निमग्न होते; ते जीव देवतेंच्या दृष्टीस गोचर होऊन त्यांचा जीवावर व्यापार चालावा म्हणून परमेश्वरानें शुद्ध जीवस्वरूपास प्रतिदेवतेचा 'एक अशा अनुक्रमें सूक्ष्मासूक्ष्मप्रपंचांतील सर्व देवतांचे 'मळ' लाविले. हा जीव जेव्हां 'मळ-सदृशभावस्थ' होतो, तेव्हां तेव्हां त्या त्या देवतेच्या व्यापारकक्षेंत येतो व या तऱ्हेनें सृष्टीची रचना होते. जीव, देवता आणि परमेश्वर हीं तिन्ही 'नित्य' आणि प्रपंच हा 'अनित्य' आहे. संहारकाळीं देवता परमेश्वरस्वरूपांत अंतर्भूत होतात, जीव मायेंत लीन होतात, प्रपंच नाहींसा होतो आणि माया परमेश्वरप्रवृत्तीची प्रतीक्षा करीत राहाते; ती परमेश्वराची 'व्यापारती' शक्ति होय. ]

१ "परमेश्वर प्रवृत्ति–" "परमेश्वर म्हणतलिया व्यक्त नव्हे : अव्यक्त। जेथ तिन्ही अंश तेथ हें नांव : एर तें कैवल्य।" "जेथ मायासंबंध तेथ तिही प्रउर्तीचा उज्रंभ ( उठावा )" "प्रऊर्त म्हणजे स्वातंत्र्ये उपजेः भंगे"––भाष्य.

"सर्व शक्तियुक्ता अव्यक्ता कृपावंता सर्वज्ञा परमेश्वरासि जीवोद्धरण व्यसनें माएचेनि संबंधें तीही प्रउर्त उपजेति। पर आगाधें समग्रे स्वरूपीं न बोलिजेति। एवं त्र्यंशीं जेतुका ईश्वरस्वरूपीं माएचा संबंध असे तेतुकाचि ठाइं उद्भवति। कां जे ऐश्वर्यादि करूनि सकळही धर्म मायासंबंधेंचि तेथ म्हणितलेः म्हणौनि व्यसनकार्य तेंहि तेतुलाचि ठाइं वर्ते। स्वरुपनिष्ठ धर्म असे यातव"––सं. प्र. ( म. वा. सू. ५ टीप पहा )

"अव्यक्ता स्वरूपाचा सृष्टिउल्लेखु माया जाणे। तर तोचि कैसा जाणे। नाः परमेश्वरस्वरूपें मायादि सकळ अंतरेंबाह्य व्यापुनी सर्वात्मक जालें असे। जैसे सकळ वनस्पतीचें आत्मक जीवनः जैसा जीवात्मा स्थूळसूक्ष्मातें व्यापुनि वर्तता। तेणें अंतःकरणीं उल्लेखू धरिलेया तयासारखीं सकळ गात्रें व्यापारों लागति। इत्यादि न्यायीं माया ईश्वराची प्रऊर्त उल्लेख जाणौनि सृष्टिरचनेसि

तथा अवतारधारित्वासि आन संहार करावयासि प्रवर्तौनि नीरंतर वोळगतचि असे ”––सं. प्र.

“ सृष्टि-संहार ”––सृष्ट म्हणजे सृजिली होति म्हणौनि तेचि सृष्ट। जीवः देवताः प्रपंचाची। “ संहार म्हणजे रचना मोडे ”––भाष्य.

“ ईश्वरीची प्रऊर्तः माएचा व्यापारः जीवाचे करण : प्रपंचाची रचनाः कर्मांची निष्पत्तिः फळीचा भोगः देवताचे विग्रहः साधनः अवतारः उद्धरण– इतुका मिळौनि सृष्ट। हे आवघे नासे तो संहार। ”––भाष्य.

६ “ वीदेहे ते नित्ये ”––सापेक्षतः न तु केवलतः ( नित्य )। “ ९ एकु नित्यवर्गः ” एकु अनित्य वर्ग ––“ तीनीं स्वरुपे नित्ये। जीवाचें: देवताचेः ईश्वरीचेः तै भेद कैसा। नाः नीत्यत्वे भेदु तिहीसि नाहीं। जैसा देहींचा पींडस्थीं रायारंका सरीः ब्राह्मण। महारा सरीः तैसा ठावो की। म्हणौनि यासि नीत्यत्वे भेद काहींचि नाहीं। तरी नित्य म्हणजे काइं। नाः काळे उपायें न नसे ते नित्य। प्रपंच काळे नासत असे। अविद्याः आद्यमळ ईश्वरउपाये नासीत असति। ते कैसेः ना। प्रपंच-संहारीं नासत असे। अविद्या आद्यमळ ईश्वरप्राप्तीं नासति। आद्यमळ संहारीं नासत असे तें केवि। नाः बांधलिए गाइचेनि दृष्टांतें। जेणें बिरडें लावीलें तो सोडी तैं सुटे कां तिए जातीचे लेंकरू सोडी तै सुटे। म्हणौनि अविद्या आद्यमळ ईश्वरउपायें करुनि नासीत असति। जीवः देवताः ईश्वर नासिताही परी न नासति। कां पाः जे नित्यवर्ग म्हणितला। आपैसया काइं नासैल पा। पर ईश्वरां नाशितां न नसे म्हणौनि नित्य ”–म. वा. प्र.

१० “ देवता उरति––” “सृजनक्रिए तव सृष्टि बोलिजे। तर तेचि कैसी नाः एक आथिले सृजिले ते जीव। एक नाथिले सृजिले तो प्रपंच। दोहीं मिळौनि सृष्टि। तर आथिलें म्हणितलें जैसे घरांत पदार्थ होते ते बाहीरि आणौनि राहाटीसि घातले। या नांवें आथिले सृजिले। मा तर देव-

ताही आथिलियाचि होति कीं । नाः तयासि जीवासारिखें सृजणें न लगे । प्रवृत्ती जाणौनि तिया अवतरौचि लागेति ।"–सं० प्र०

" जीवाते कांहींचि नाहिं । नसुद्धां स्वरुपेसि उरे । खेद आल्हाद ते प्रपंच-संबंधें अनित्यवत । "–भाष्य.

११ " अनादि अविद्या "–आदि नाहीं याते अनादी बोलीजे । ईश्वरासि आदी नाहींः जीवा देवतांचि आदी ईश्वर नेणतिः आन ईश्वराची आदि जीव देवता नेणति । म्हणौनि ये तीनी पदार्थ स्वतंत्र अनादीचे । यांचीए पांतीं अविद्या कै लागली असे ऐसें नेणीजे म्हणौनि हेही अनादीची । "

" भावरूप अज्ञान याते अविद्या म्हणितलें । सृष्टीमध्यें जेतुलें भावलें असे ते भावरूप अज्ञान । जैसा अंधकारु आन धू । दिवा लावलेया अंधकारु जाए परि धू न वचे । आन डोळां तरि दीसे । तैसे ज्ञान जालेया भावरुप अज्ञान जाए पर अविद्या न वचे । ते प्रकाशे पर नासे ना । ते ईश्वर आपुलेनि सामर्थ्यें नाशिती ! "––म. वा. प्र.

" कर्मलेप "––जीवकृत–शुभाशुभकर्मणां स्मृतिमात्रं चिह्नम् ।

## ५ संसरण

[ ' संसरण ' हे पांचवे प्रकरण असून यांत २७ सूत्रें आहेत. याचे दोन सरवळे असून पहिल्यांत ' मूळसृष्टिव्यवस्था ' पंधरा सूत्रांत सांगून " प्रति-सृष्टिव्यवस्था ' अथवा प्रावाहिकसृष्टि पुढील १२ सूत्रांत दिली आहे.

परमेश्वरास सृष्टिरचनेची इच्छा झाल्यावर जीव हे शुद्ध असले तरी अवि-द्यायुक्त म्हणून ते स्वतः कोणतेही कार्य करण्यास असमर्थ असतात; यासाठीं त्यांना प्रेरक म्हणून परमेश्वरानें ' जीवा–संलग्नाची ' भेट करून दिली. हा ' संलग्न ' जीवास प्रत्येक कार्यास साथ देत असतो; व त्याच्या शुभाशुभ-कर्मास साक्षी राहून प्रेरक होतो, आणि जीव त्यामुळेंच कर्मप्रवृत्त होतो. मागें सांगितल्याप्रमाणें जीवास, देवता-व्यापारवश होण्यासाठीं, अनेक ' मळ ' लागले आहेत; आणि तो ' संलग्न'युक्त जीव मायावशें आणि देवतांच्या ' मळा'च्या

आधारानें प्रपंच मांडतो. अशाप्रकारे ' संलग्न ' व जीव स्थूलप्रपंचपर्यंत मलीन होतात, अथवा चैतन्यप्राप्तीपर्यंत उज्वलही होतात. ]

१ " मायास्वरूपीं "–" अव्यक्ता स्वरुपाचा उल्लेख माया जाणे: तर तोचि कैसा जाणे । ना : परमेश्वरस्वरुपें मायादि सकळ......" ( संहारण, सूत्र १ यावरील टीप पहा. )

" ऐसी ते आद्यशक्ति माया: तीएचा स्वरुपीं एकदेशत्वे तनुमत्स्यवत तम असे । "––सं. प्र.

" एकदेशीं " –– " संख्ये वीषयो नव्हे तो एकदेश : एथा पृथ्वी परमाणुवत । डोळेयांत काळीमा तैसे तम एके शेवटीं " " कश्मळ तें एकी कोनि असे: दृष्टी पुढां नसे: जैसा पुंजा एके कोनी घालीजे : दृष्टी पुढां चोखट : वीरक्ताचा दृष्टि पुढां पदार्थ पडिला परि से नाहीं तैसे आव्येक्ति कार्य प्रवर्ते ।"

" एकदेश तो कैसा : ना : अव्यक्ता स्वरुपाचा शेवट : जैसा महाराष्ट्राचा सेवट हाळीपाळी तैसा । " सं. प्र.

" तम असे–– " " तम म्हणजे काळिमा । एथा लाहासे ( अंगावरील हिरवा तीळ ) । जैसे अवघे आंग गौरवर्ण परि कणु एक अनदृश्य । मा तैसे जर तम म्हणितलें तर तयाचे पदार्थ बहुत असतां काळिमा कां म्हणावी । तर तेंचि कैसें । ना : तम अज्ञानाते म्हणितले असतां काळिमाचि कां म्हणितली । ना : जर तामस गुणाते तम म्हणावें तर तीएचें स्वरूप आवघेंचि त्रिगुणात्मक । तेथ तयाचाचि कवण विशेष । ना : जर अंधकाराते तम म्हणावे तर अनंता ब्रह्मांडाचे अनंत शतसूर्यो : तयाचे प्रकाश जयाचा स्वरूपांत अनुषंगिक हारपौनि असत तेथ अंधकार कैसा असेल । ना : जर अज्ञान तेंचि तम म्हणितले तर ईश्वरविषयींचे तथा जीवस्वरूपाचें देखणें नाहीं । ऐसें अवघेंचि स्वरूप असतां एकदेशीं तमशब्दे अज्ञान म्हणणे ते कांहींचि न घडे । आन आपणेयां खालौते तर आवघेंचि ज्ञानरूप असे : म्हणौनि तम काळिमाचि होए । मा तर काळिमेचा ठाइं ज्ञानादि कैसे । ना: जैसी डोळ्यांत काळिमा असौनि देखणें ते जैसे तैसें असे। तेणे न्यायें तम-

स्वरुपांत ज्ञानसुखसामर्थ्यादि असौनि काळिमा इतुलाचि विशेष जाणावा। पर तें तम मायास्वरुपाची थोरी पाहुनि पृथ्वीपरमाणुवत सानेपणें एके शेवटि असे। तयाचा ठाइं सकळ जीव एथावकाशें समुद्रिं जळचराचेंनि न्यायें हारपौनि असत। ऐसे तें तम अनादि मायास्वरुपीं असतचि असे "--सं. प्र.

२ "तमोनिमग्ना"–तीए तमीं मज्जित अनंत जीव असतः कां जे तमोनीमग्न जीव मायास्वरुपीं असत म्हणितले म्हणौनि :। तर नीमग्न म्हणजे तमस्वरुपाचीए थोरिये आंत अनंत कोटीचे जीव आपुलेनि स्वरुप–अवकाशें हारपौनि असतः एथा समुद्रीं जलचरें एकांसि एके हारपलिं असत तेणें न्यायें जीव जीवासि हारपलेपण दाटलेंपण नाहीं।–सं. प्र.

मागील सूत्र व हे सूत्र हीं दोन वचने " तमस्तीत " ( तमस्थित ) मानून नंतर संसरणाच्या पाठास सुरवात होते, असा ' संसरण प्रमेय' कारांचा अभिप्राय आहे; " मागां दोनि वचने तमस्तीत सांघीतलीं। आतां संसरणाचा पाठ सांघता असीजे। तर संसरण म्हणजे जीवा देवतांची संचर। ती परि (प्रकार) सांधीतली म्हणौनि संसरण। म्हणजे ईश्वराची साधन बोलिजे। "--सं. प्र.

३ " परमेश्वर .प्रउर्ती "--" परमेश्वर म्हणजे समर्थः भलतें करूं शके जीवाचा ईश्वरही। " " परम ऐश्वर्यें जें उद्धरण तेणें जीवाचा ईश्वरही करावया सृष्टि रचावेयाची प्रउर्त उपजेः कां जें तिएवांचौनि अवतरण न घडे म्हणौनि सृष्टीमध्ये अवतरति म्हणितले। एवं तिएमध्ये अवतरौनि जीवाचा ईश्वर करीति। "--सं. प्र.

" प्रवृत्ति म्हणजे उल्लेखु। तोचि अव्यक्ते स्वरुपीं मोटका मोहरैजे। तर मोटका म्हणजे नेटकाचि मोहर जव घेतां तव माया जाणे। कां जे ईश्वराचीए अव्यक्तें स्वरुपी समवाएतवें ( समवायतवें ) मनाचियापरि म्हणितलें असे म्हणौनि जैसा जीवासि संकल्पविकल्पात्मक उल्लेखु मनाचा ठाइं उपजे तैसा ठावो। तर उल्लेखु म्हणजे जैसा जीवासि स्वभावरूप प्रथम उल्लेखु उपजे तैसा ईश्वरीचा जाणावा। "--सं. प्र. ( पुढें सूत्र ८ वरील टीप पाहा )

३ " मायातमोनिमग्ना "--" तमोनिमग्ना म्हणजे जीए तमीं निमज्जन पातले असत : जीवा म्हणितलेयां चैतन्यही लाभेः दोहिं सारिखें उपजवी।

तर सारिखें म्हणजे चैतन्यमहं ऐसें जीवासि उपजवी । आन संलग्नासिही तैसेंचि उपजवी । उपजवी म्हणितलेयां प्रथम उल्लेखवाचक । तर जो उल्लेखु उपजविला: जो अन्यथाज्ञानरूपत्व: तेणेंचि उल्लेखें जीव संलग्नातें मी म्हणे ते कवण चैतन्य । ना: ते मुख्यातें म्हणितलेयां व्यापका चैतन्याते मी म्हणे । "--सं. प्र.

" चैतन्यमहं ऐसें "--" सृष्टिकाळीं जें चैतन्य ज्ञानरूप होतें ते जीवासरिसें अज्ञान केलें: मग दोहींसि अन्यथाज्ञान उपजवीलें । सृष्टिकाळ म्हणजे ईश्वराचा प्रवृत्ति--उल्लेखु : तो जाणौनि अव्यक्त माया संलग्नत्वें विभागली । " " सृष्टीकाळीं माया ( जीवातें ) विकरुनि विभागली । तया विभागाचेंही नांव चैतन्य । तें विभागले तेव्हेळीं जीवासरिसें अज्ञान केलें । तर सरिसें म्हणजे तयाचि सारिखें अज्ञान केलें : ज्ञानसुखादिक माएनें आकर्षिलें । पुढां कर्मचेष्टकापुरतें उरवीलें । जैसा कोळसेयाचा आवघा अग्नि गेलेया कींचित उरला दीसे तैसा ठावो देवतेचेया खंडज्ञानाचा जाणावा : तैसा ईश्वरीचा ज्ञानादिप्रकाश न वचे ते अखंडज्ञान । "--सं. प्र.

" उपजवी "--" चैतन्यमहं उपजविले ते अन्यथाज्ञान ऐसे घडताए । तर तेंचि कैसे । ना: संलग्नीं उल्लेखु उपजविला तो ऐसा: आपुलेया व्यापका स्वरुपाते--मीं एव्हडें--म्हणितलेयां आपण जीवाएवढें असतां व्यापकाएव्हडें आपणासि म्हणे : एणें अर्थें अन्यथाज्ञानें घडत असे । जैसें पिंडस्थेसि आपण ब्रह्मांडस्थे एव्हडी ऐसें जर उपजवीले तर ते अन्यथा ज्ञान तैसें जाणावें । " --सं. प्र.

" तर संलग्नाचे अन्यथा ज्ञान कैसें । ना : जैसा राज्यपुत्र भ्रष्ट होवौनि चाटुकर्म करीतां राजपदवीचा अहंभाव धरौनि आपण राजा असों ऐसें म्हणवी: मा तें जैसे तयाचे अन्यथाज्ञान । अथवा ब्राह्मण कर्मचांडाळ जालेयां आपण उत्तम श्रोत्रि असो म्हणे : तर तेंही तयाचें अन्यथा ज्ञान : तैसेंचि संलग्नाचें जाणावें । "--सं. प्र.

४ " संस्कृतछाया " --" माया जीवान् विकरोति संचालयति ध्यानयति प्रसूयते विभाजयति अवधापयति निःसारयति प्रवेशयति च । "

या सूत्रास " गर्भाष्टक " असें म्हणतात; कारण ' गौसाहित्याचेनि दृष्टान्तें ' सूत्रसिद्धांत स्पष्ट केला आहे. " 'विकरें' म्हणजे जैसा गाइसि गर्भसंभुतिचा विकार होए। मग ' संचरे ' म्हणजे जैसें तीएसि गर्भाधान संचरलें राहे । मग ' विए ' म्हणजे व्यनत होए । मग ' प्रसवे ' म्हणजे गर्भधानाची खोळी सांडौनि योनिपासी आणी । मग ' हालवी ' म्हणजे वेणेचेनि बळें आधे वत्स भितरी असतां सीसखुर बाहिर पडेति वांसरुवाचे ।" " मग ' डोचली ' म्हणजे आणिके वेणेचेनि उत्कर्षे जार फुटौनि माजापासौनि वत्स बाहीर ए । मग ' उगळि ' म्हणजे अवघेचि वत्स योनि बाहीरिं घाली । मग ' लोटी ' म्हणजे भोइवरी वत्स पडिलेयां जीभेने चाटणें तेंचि लोटणें जाणावें । "–सं. प्र.

" विकरे "–" प्रथम माया जीवातें विकरे म्हणितलेयां आपण विकरे आन जीवाते विकरवि । तर आपण विकरे ते ईश्वरप्रवृत्ति जाणौनि शारिरें मानसिकें विकरे । तर मानसीकाचा विकार तो सृष्टिरचनेचा मनोधर्म करी । तेणेचि मनोधर्मे शारिरे विकरे । " " मा तर जीवातें विकरवि : चैतन्यमहं ऐसा उल्लेखु उपजउनि अनारीसेया करी । तर तेंचि कैसी करी । ना: जैसा निद्रीस्थासि उठावे ऐसा उल्लेखु उपजे तैसा ठावो । " सं. प्र.

" संचरे "–" जीए स्थानीं आसत तेथौनि परते सारी " " ना गर्भाधानीं वत्स होते: तयाते देवताप्रेरकव्यनत–वायो योनीद्वाराकडे परतें सारी: तैसे माया शारीरसामर्थ्ये तमांत नीमज्जन होते तयाते सृष्टीचीए रचनेकडे परतें सारिलें । जैसा चौधारगुंडा : जैसा ज्या वाहाणी कीजे तैसा हा ( जीव ) परता सारिला "––सं. प्र.

" वीए "– मागिलीए वचनीं परतें सारि म्हणितलें तेंचि सारितां सारितां खोळी सांडी । जीवा तमाचीए खोळीए आंत नीमज्जन जालें होते: तेथौनि चौधाराचेनि न्यायें परतें सारीतां तमाचि खोळि सांडौनि बाहीरी नीगतीए अवधी जवळि आणिलें "––सं. प्र.

" प्रसवे "–" म्हणजे आधे आंत आधें बाहिरी: जैसे शीस-खुर बाहीरि पडति वांसरुवांचे : तेणें साहित्यें जीवाचें स्वरुप आधें तमांत आधें बाहिरला स्वरुपांत ।"––सं. प्र.

" हालवी–––" " म्हणजे सरीसे करी " " जैसे बाण शतांचे एकवाट असत। मग पडिलीए प्रसंगीं निवडिजेति । एक कलियाचे: एक दुधारीए: तैसेचि तीधारीए: चौधारिए: कापखंड: कुऱ्हाडिए: ऐसे यांचे जे जे वेगळाले कीजेति तन्न्यायें जिए जिए ब्रह्मांडीचे जीव ते ते तया तया ब्रह्मांडाचेनि उजकारें नीवडुनि लाविजेति । याच नावें सरिसे करणें ।"–सं. प्र.

" डोचली "––" माया जीवाते डोचली म्हणजे सावधा करी म्हणितलेयां मागिला अन्यथा ज्ञानाचा अभीन्नवश (अभिनिवेश-अभिमान) । तर तोचि कैसा: ना मागा चैतन्यमहं या अन्यथाज्ञानाचा उल्लेखु उपजउनि जीव अनारिसा केला। तरी अनारिसा म्हणजे तयासिही तैसाचि उपजे । तयाते प्रथम उल्लेखु बोलिजे। मग तयाचा रसरूप जाला । जैसा संबंधीं विकार उपजे । तिए प्रथम उल्लेखीं रसरुपी होए: तयाते दुसरा उल्लेखु बोलीजे । तैसा जीव अन्यथा ज्ञानरूप उपनलीए प्रथम उल्लेखीं रसरुपी जाला । या नावें अभिन्नवेश । कां जे माया जीवाते विकरे । हा प्रथम उल्लेखु: मग हाहि विकरे । विकारीं रस जैसा म्हणितलें यातव । एवं रसरुपत्वे उल्लेखे सावध जाला "–सं. प्र.

" उगळी "–– " माएने सामर्थ्यें डोचलूनि जीव तमाबाहिरे घातले म्हणौनि उगळी म्हणितले । हें उगळणे मूळसृष्टीसि लाभे : ना : प्रावाहिक प्रवृत्तीसि । तर जैसे सर्प आवीष बाहीरे घाली तेणें न्याये जेणे मार्गे संहारीं जीव तमांत घातले होते तेणेंचि मार्गें बाहीर काहाडि । " –– सं. प्र.

" लोटी "–– " जैसा वत्स योनी बाहीरे घालीतांचि भूमीवर लोटिले होए तैसी माया जीवातें लोटी । " " जैसें वत्स भूमीवरि पडतां क्षेण एक निश्चल असे तैसे जीव ब्रम्हांडपरत्वें स्वरूपाचेनि आधारें लोटिलियां क्षण एक जडवत असति । "––सं. प्र.

[ " आतां चौथया वचनापुढें पाचवा वचनाचा मागिलें अर्थेसी संबंध कैसा । नाः गर्भाष्टकीं माएचा शारिर मानसीक व्यापार बोलिला । तयासि मतिजड जीव विषयो जाला । नाः तो परमेश्वराचीए सर्वात्मक प्रवृत्तीवांचौनि माएसी सर्वथा विषयो नव्हे : प्रवृत्ति उपजे तर तीए अधिन होए । याचा साभिप्राए · परमेश्वराची प्रवृत्ति संसरणीं जीवासीचि आदि असे । या तव तीये प्रवृत्तिने माएचिया व्यापारासि वश होउनि उपजविलेनि अन्यथाज्ञानरूप उल्लेखें चैतन्यमहं ऐसें घेउनि उठिति । तेचि अविद्यात्मक जीव । तर ऐसें नांव कां तयासि । ना : जीवाचा आत्माचि अविद्या जालि असे । आन माया तीयेतेंचि आत्मा म्हणे । तेणेचि आधारें चैतन्यमहं उपजवीत असे । "-- सं. प्र. ]

५ " घेउनि उठीति "--" म्हणजे तेणेंचि अहंभावेसि सावध होति । एथा निद्रिस्थ मागिल अध्यासेंसीचि उठी । तर जीवासि मागिल अध्यास तो कवण । नाः चैतन्यम ऐसा प्रथम उल्लेखु उपजविला । तयाचेनि अध्यासेंसि रसरुपि होउनि सावध होतिः याचि नांवें घेउनि उठणें जाणावें "--सं. प्र.

हो कां तर । 'परमेश्वर प्रवृत्ति मायातमोनिमग्ना जीवा चैतन्यमहं ऐसें उपजवि' ( २२-३ संसरण ) या वचनापुढेसि " चैतन्यमहं ऐसें घेउनि उठिति " ( २२-५ संसरण ) हें वचन असावे कीं । ना· चैतन्यमहं ऐसें जीवासि उपजवावें हें तीएचें मानसीक । तीएची पांतीं माएचा सकळ शारीर लोटिपर्येत सांधितला । त्या पाठीं जीवाचा सांगावया हें वचन एथ मांडीलें असे । दुसरें तमांतचि चैतन्यमहं घेउनि उठिति ऐसें नाहिं । तमा बाहिरी पडत पडतां चैतन्यमहं घेउनि उठीति । एवं उगळी आन लोटि या दोहीं वचनाचीए अर्थीचि हे वचन जाणावें । "--सं. प्र.

६ " चैतन्यमहं "--" चैतन्यमहं घेउनि उठणें ते शब्दें बोलौनि उठला ऐसा नव्हेः अथवा बैसला होता तो उभा ठाकला तैसाही नव्हे । एवं रसरुप उल्लेखें सावध जाला ऐसा अर्थ । आन सावध होणें याचि नांवें जीवा जन्म बोलिजे । तथा चैतन्यमहं म्हणणें तेंचि अन्यथाज्ञान । तयाचि अन्यथाज्ञानत्वाचा ' आदिमळ ' लागला । "-सं. प्र.

" आद्यमळ "–" आवघेया मळां आधिं लागला म्हणौनि मायास्वरुपाचा नव्हे: आवघेया संसरणासि आदि जाला म्हणौनि । आन आवघेया आदि जो परमेश्वर तयाची प्रवृत्ति जाणौनि माएने लाविला म्हणौनि आदि । "–सं. प्रा.

" आन मळ म्हणजे संकोचीः मैळी यातव म्हणितला । मा जर संकोचौनि मैळला तर कांहीं खेदातें पावला असैल म्हणौनि सांगताति । आदिमळ लागलेयां जीवासि आल्हाद आति । परमेश्वर प्रवृत्ति लागला म्हणौनि तयाचा खेद नाहीं । ऐसाचि मनुष्यमळपर्यंत आल्हादचि असे । मग स्थुळें प्रपंचीं आल्हाद आति तथा खेदही आति । "––सं. प्र.

" हो कां । जीवाची परि ऐसी सांघीतलि । तर संलग्नाची कैसी असे पां । नाः मलरचनेसि दोहींचि सीरीखीचि । कां जे : जीव म्हणितलेया एरही लाभे । ऐसेंचि मागांही सांघीतलें । "––सं. प्र.

७ " मायासृष्ट "—" मायासृष्टि म्हणजे सृजनांत सृष्टि । याचा अर्थ सृजनक्रिएतव सृष्टि बोलिजे । तर तेचि कैसीः नाः एक आथीले सृजीलें ते जीव । एक नाथिले सृजीले तो प्रपंचः दोहीं मीळौनि सृष्टि । तर आथिलें म्हणजे जैसे घरांत पदार्थ होते ते बाहीरि आणौनि राहाटीसि घातले । या नावें आथिले सृजिले ।"––सं. प्र.

" प्रपंच "––" पंची विस्तारे या धातुतव कारणीचा विस्तारें जाला तयातें प्रपंच बोलिजे । म्हणजे पंचभौतिक त्रिगुणात्मक म्हणितला । तथा भूतें कणस्थानीं: गुण उदकस्थानीं: ऐसे आठाचा कर्दम जाला । तो कर्दमरूप प्रपंच ईश्वराचीए मुळप्रवृत्तिपासौनि अवांतर रचला म्हणौनि तयाते नाथिलें सृजिलें म्हणितले । "

" जीवें सृजिलाः तर तोचि कैसाः नाः मतित्रयासि मायेचे सामर्थ्यें साक्षभूत जाले तेणें विश्वमळादि मनुष्यमळपर्यंत गंधर्व नगरवत रचना केली । यातव जीवसृष्टिप्रापंच म्हणितला । "––सं. प्र.

" सृजनक्रिए आदिमळ विषयो जाला । विषयो म्हणजे अविद्या छेदावया उपयोगी जाला । एवं तो मायास्वरुपाचा नव्हे । तर तोचि कैसा । नाः जीव-

सृष्टि म्हणजे सृजनक्रिए विषयो जाला जो पदार्थ विश्वमळ म्हणितलें तो जीवस्वरुपाचा बिभाग नव्हे । तैसाचि आदिमळ सृजनक्रिए विषयो जाला पर मायास्वरुपाचा नव्हे । एवं विश्वमळापासौनि परंपरा स्थूळपर्यंत जीवाचीए सृजनक्रिए विषयो जाला । मा तर स्थूळ प्रपंच काइ जीवेंचि केला । नाः तो देवताकृत । पर जीवाचेया कारणासि तथा फळभोगासि उपयोगें विषयो होत असे । म्हणौनि प्रपंच रचनेसि आदि जाला हे होए । पर स्थूळ जीवकृत नव्हे । तो देवताकृत । मा तर स्थूळ देवताकृत हेंचि काइसयातव । नाः ईश्वरप्रवृत्ति माया सृष्टिसंहार करी म्हणीतलेयां सृष्टिरचना करी आन तीएचा संहारही करी । तर सृष्टी ते जीव देवता प्रपंचाचि । तोचि प्रपंच द्वीधा : स्थूळ आन सूक्ष्म । तो आपुलेनि सामर्थ्यें जीवाकरवि करवीलाः आन स्थूळ तो आपणचि केला । एवं पांचा भूतांचा तथा तिहीं गुणाचा जो कर्दम तया नांव प्रपंच । तयाचा सूक्ष्मः पर तयासि परमाणु नसेति । तो जैसा जीवाचीए सृजनक्रिए विषयो होत असे तैसाचि आदिमळ माएचीए सृजनक्रिए विषयो होत असे ऐसे जाणावें "--सं. प्र.

" माएने अन्यथाज्ञान उपजौनि आदिमळ लाविला इतुलेचि ना । सामर्थ्यें डोचलौनि सावध केला । मग चैतन्यमहं घेउनि उठिला । तेणेंचि अन्यथात्वे जन्मातें पावौनि दीधलेंनि सामर्थ्यें समर्थ जाला । आन अविद्यमान प्रपंच होता तयाचा विश्वमळादि सूक्ष्म रचौनि सकळ जीव देवतासि विद्यमान केला म्हणौनि जीवकृत प्रपंच म्हणितला । कृत म्हणजे करण : आन करण म्हणजे कर्तृत्वा बाचक । तया कर्तृत्वाचीं कारणें तिन । कारणासहीत जे कार्ये उद्भातें पावे तयाते समवाइ कारण म्हणावें । जैसे कापुसाचा ठाइं तंतु होइजेति ऐसे अस्तित्व असे । मग तयाचें कार्ये कापुससहित तंतु होए । ते समवाइ कारण । मग तया बहुताचेनि योगें कापुस जालाः तें असमवाइ कारण । मग तया कापुसाचे तंतु जाले ते असमवाइ कारण । तया बहुता तंतूंचा योग जाला ते असमवाइ कारण । मग तया बहुता तंतूचा जेणें पट केला तो निमित्त कारण । ऐसीं तिहींकारणाचीं उपलवणें जाणावीं : तैसीचि कुलाळाची लक्षावीं ।

मृत्तीकेचा ठाइं घट होइजे ऐसें अस्तीत्व असे तें समवाइ कारण । मग लादि-रक्षा-उदकाचा योग होए ते असमवाइ कारण । मग तया कर्दमाचाचा घट जो आकारी तो निमित्तकारण "--सं. प्र. ]

८ " मायाकृत "--" मायाकृत जीव म्हणजे केलें निमीतलें । एथा कुला-लवत । म्हणजे तैसा आइताए मृत्तिकेचीए परि अचेतन होता तयाचा आकार जीवरुपी करुनि चेतन केला । ऐसें जर म्हणावें तर सकळाचेया सुखदुःखाचे ग्राहकत्व ऐसे जें जीवत्व ते काईसेयाचे केले । तेंचि मायास्वरुपाचें म्हणावे तर सकळाचेया सुखाचे ग्राहकत्व काइ तो स्वरुपासि असे । नाः तें नित्यबं-धाचें कांहिंचि नसे । स्वसुखावांचौनि कवणीन्चि सुख न प्रभवेः यातव तीएचया स्वरुपाचें नव्हे । तर जीवत्व म्हणजे जीवाचा अंतरींचा भावो अविद्येचेनि योगें कार्यासि आलाः तयातेंचि जीवत्व म्हणितले । जीवाचें जीवत्व माएचेनि निमित्त कर्तृत्वकासि आले । वांचौनि मायास्वरुपाचें नव्हे । एवं माएने जीव रसपासि आणिले : पर चेतनत्व जीवत्व आपुलीया स्वरुपाचें देऊनि आणिले ऐसें नाहीं । एवं परमेश्वरप्रवृत्ति आपुलेनि सामर्थ्यें जीवाचीए स्वरुपीचें जीवत्वरूप चेतनत्व कारणि होतें तें कार्यासि आणीलें इतुलेनचि वाचक । "--सं. प्र.

" जीवकृत "--" एथा मायाकृत जीव तथा जीवकृत प्रपंच निमितत्वें जाणावा " "तैसाचि जीव प्रपंचासि समवाइ जर जाला तर जीवस्वरुपाचाचि प्रपंच जाला ऐसेंचि होईल । म्हणौनि दोन्हीं कारणें निराकरीलि । आन नसुध्दें निमित्तचि कारण स्थापिले । एवं जीव-कारणासि निमित्तकारण माया जाली तैसाचि जीव निमित्त प्रपंचासि जाला । "-सं. प्र.

९ " मायाकार्य जीव"--"माएनें परमेश्वर प्रवृत्ति जाणौनि प्रवृत्ती भीतरि जेंहिं उपाइं जीव कार्यासि एइल तैसा हेतु होते तें जाणौनि तेंही उपाइं जीव तमीचें ब्रम्हांडीं स्रजीले । तथा सामर्थ्य देउनि रुपासि आणिले । ऐसी आपण निमित्तकारण होउनि जीवाचा ठाइं जें जें कारण आस्तित्वरूप होतें तयाचें कार्य प्रगटलें । म्हणौनि मायाकार्यें जीव म्हणितला । "--सं. प्र.

" जीवकार्य प्रपंच "--" प्रपंचाचा ठाइं अनेक प्रकार भाव अस्तित्विं होते । तयासि माएचेनि सामर्थ्यें जीव निमित्त होउनि नव्हता प्रपंच सृजिला । तोचि सामर्थ्याचेनि तुटकणें उत्तरोत्तर मनुष्यमळपर्यंत सुक्ष्म केला । म्हणौनि जीवकार्य प्रपंच म्हणितला । आन जीवोद्धरण करावया सृष्टीची रचना होआवी म्हणौनि प्रवृत्ति उपजलि । तियेचि प्रवृत्तीनें प्रपंच द्रवला । ऐसा स्थुळा सुक्ष्मा प्रपंचासि जीव निमित्त जाला । "--सं. प्र.

"प्रपंच कार्य जीव कारण । जीव कार्य माया कारण । तयांही परमेश्वर कारण म्हणितला । तर तोचि कैसा । ना: जैसें जीवन सकळ वनस्पतीचें कारण : तयाचेनि योगें लउलउति असति । तैसीया देवता ज्ञानादि पांचा प्रकारीं ईश्वराचीए प्रवृत्तीतव कार्यासि येति असति । आन तया पांचा प्रकारचें कार्ये कांहीचि न वर्ते म्हणौनि । "--सं. प्र.

[ ७-८-९ या सूत्रांतील ' सृष्ट, ' ' कृत ' आणि ' कार्य ' या शब्दांच्या अर्थातील फरक महत्वाचा आहे, तो मागील टीपांवरून स्पष्ट होईल.

"एवं अनादि मायास्वरुपीं तमांत जीव मतिजड तैसे होते । तयातें माएने शारीर मानसीक व्यापारें जन्मउनि कार्यासि आणिलेयां आपण काइं करी पां । शारीरें उदास होए । पर मनोधर्माचें सूत्र असतचि असे । " ]

१० " यापरि "--" शारिर मानसिक व्यापारें "

" जीवातें जन्मौनि "--" तेणें मानसीकें आन शारिरें जीवाते जन्मौनि म्हणितलेयां तमाबाहीरि घातले । तेहि जीवीं व्यापकाचेनि आधारें विश्वमळादि मनुष्यमळपर्यंत सूक्ष्म रचिला । इतुलेंनि माएचें शारिर आवघेंचि राहिलें । " --सं. प्र.

" उदासीन होए "--" उदासीन म्हणजे शारीरव्यापार राहिला "--भाष्य

" सूत्रातें न संडी "--" पर मनोधर्म असे । जैसे अनादिचे जीव तमांत असत तैसाचि तयावरील मनोधर्म तोहि अनादिचाचि असे : एथा प्रधान पतिव्रतावत । सकळ पदार्थ स्वामीचे: तेयासि एलता होआवी म्हणौनि लागलेंपणें मनोधर्म असे । तैसाचि अनादिचा माएचाहि असे । म्हणौनि उरे म्हणितलें । तें उरलेंपण उद्धरणाचा सेवट विशेषज्ञानपर्यंत असे । "--सं. प्र.

" एथा वृद्ध जालेया मातेचे आधील करण राहे । मग तो स्वतंत्रिए उठेः- बैसे । पर मनो धर्म्र आसे । ह्मणें अवजतन होए । "–भाष्य.

[ " आतां चैतन्यमहं जीवा जन्म बोलिजे । तथा साहावीया वचनें लाघि-कासंबंध असे । जन्मलेया नंतरे जीव मायास्वरुप व्यापकाचेनिचि आधारे असत ।"–सं. प्र. ]

११ "आधीन"––"म्हणजे दो आधार"–भाष्य "जैसें उदक नैसि (नदीसि) विहिरीसि अडासि आधारभूत असे तैसाचि जीव जाणावा । तमाबाहीरि पडि-लेयां व्यापकाचेनि आधारे जीव मळ रचिती । ते नदीस्थानि । कां जे सुक्ष्म रचनेचा प्रवाहो मनुष्यमळपर्यंत असे । मग जैसें वीहीरीचे पाणी नीश्चल असे तैसे तमांत होते आन वीहीरिपासि अडांत जैसा संकोच असे तैसेचि जीव एक्षीणीचेनि मळे संकोचले । "––सं. प्र.

" कां "–– " ऐसे जर माएसि अधिन असत तर " .कां प्रपंचासि " ऐसेचि कां म्हणितलें । ना : प्रस्तुत जैसे माए अधिन असत तैसे प्रपंचा अधिन नसेति । अवघा सूक्ष्म निर्वाळलेयां चतुर्विधा कर्मफळा जाति म्हणितले । तेव्हेळिं प्रपंचा अधीन होतील म्हणौनि ' कां म्हणितला । "—सं. प्र.

" मध्यें असणेंचि नाहीं "— " जीवस्वरूपासि त्रिलींगाकार कव्हणिचि नसौनि उदकवत सलील होतसांतें अच्छेद चेतन असे । पर तयासि माएचेया तथा स्थुला प्रपंचाचेया आधारावांचौनि असणेंचि नाहीं । "—सं. प्र.

१२ " जन्मला सांतां "—" जन्मला सांतां म्हणजे तमा बाहिरी पडिला होतसातां । तर जन्मला तो कैसा । ना : अविद्येसि माएसि सूक्ष्मेसि देवतासि स्थूळेसि जीवासि । तमांत जीव होते ते देवतीं देखिले नव्हते । आन तया जीवासि परस्परें देखणें तेंहि नव्हते । मग सुक्ष्म रचिलेया मळाधार देवतासि जीवाचे दर्शन जालें । म्हणौनि तयासि जन्मला । " " जैसा अनादीचा जीव परमेश्वर देखतांचि असतां जेव्हेळीं अनुसरला तेव्हेळीं तयातें जन्मला म्हणि-तलें । तैसेंचि अनादीचें अविद्याधार दर्शन असता परमेश्वरप्रवृत्ती माएचीया व्यापारासि वश जाला तेव्हेळिं तीएसि जन्मला । "—सं. प्र.

" क्षेणपर्यंत सुध "—" आदिमळेसहित जीवातें शुद्ध म्हणितलें असे। कां जें प्रपंच रचावा या वासना मैळत असे म्हणौनि। " " क्षणपर्यैंत शुद्ध असे म्हणितलेया प्रपंचरचने वासना नव्हति म्हणौनि जीवाते शुद्ध म्हणितलें। पर आदिमळातें शुद्ध कां म्हणितलें। नाः तो प्रपंचापेक्षां शुद्ध आन तो अन्यचि जात्य। " सं. प्र.

" मग मैळे "—"पहिलें प्रपंच रचावा या वासना मैळे। मग चांग म्हणितलेयां विश्वमळ रचौनि तादात्म्य पावे। याचिपरी मनुष्यमळपर्यैंत चांग मैळे। जैसी रोटी खावेयाची वासना उपजे तेंचि तव मळिणत्व। मग तीए वासनेची आवृत्ति करी तव वरिता खावो लागे तेव्हेळिं चांग मैळला तैसा ठावो। " —सं. प्र.

[ " हो कां तर जीव जन्मला सातां क्षेणपर्यंत शुद्ध असे मग मैळे म्हणितलेयां समस्त सुक्ष्म निर्वाळलेया कर्माचरणे मृत्तिकापर्यंत मैळे। पर संलग्नाचेनि आधारे सुक्ष्म रचितां तयाचा आधार नाहिंः व्यापका स्वरुपाचेनि आधारें सुक्ष्म रचित असत म्हणौनि।"—सं प्र. ]

१३ " चैतन्य "—" म्हणजे संलग्न म्हणजे सम्यक् प्रकारे। लग्न म्हणजे जीवासि लागले म्हणौनि। " [ प्रथम माया आपण विकरे आन जीवातें विकरवी। ते ईश्वरप्रवृत्ति जाणौनि शारीरे मानसीकें विकरे। मानसीकाचा विकार तो सृष्टिरचनेचा मनोधर्म करी। तेणेंचि मनोधर्मे शारीरें विकरे। तया स्वरुपशारीराचें संलग्नत्वे जीवपरत्वें विभाग होति। संलग्ने उल्लेखु उपजविलेया स्थूलदेहीया क्रिया करुनि प्रवर्ते।"—सं. प्र. ]

" मृत्तिका "—" म्हणजे स्थूळ परमाणु। सूक्ष्मावेगळा स्थूळप्रपंच। तयाचा निर्देश परमाणु। " " तो जड परमाणु मायास्वरुपाचा नव्हे। तयाचा ठाइं सामर्थ्यें दुःख भोगावया जाली। ते सामर्थ्यें जड म्हणौनि जड होए। "—सं. प्र.

" पर्यंत "—" तें पर्येत म्हणजे मळिणत्वाचा शेवट। तर मळिणत्व ते दुःखा वाचक : तें दुःख जडा परमाणुतें थोर नाहीं। " " चैतन्य मृत्तिका ही

सकळ फळाचा सेवट म्हणितला । एवं सुखाचा सेवट चैतन्यफळ आन दुःखाचा सेवट मृत्तिका । तर मृतिका म्हणितलेया प्रपंच परमाणुचा ठाइं दुःख पावीजे तोचि सेवट । तया सकळ फळाचे दोनी भेदः एक्षिणीपासौनि चैतन्यपर्यंत देवताफळें । तेथ स्वरुपाचेनि आधारें दुःखें देति । आन मनुष्यत्वा खालौति जडपर्यंत तेतुलीं नरक फळे । तेथ सामर्थ्यें दुःखें प्रभवेति । "—सं. प्र.

चैतन्यफळ जे संताचा सेवट तेथपर्यंत जीव उजळे । आन असंताचा सेवट मृत्तिकेचा ठाइं जे केवळ दुःख तेथपर्यंत मैळे । वांचौनि नसुर्धेचि केवळ दुःख म्हणितलें । तीए दोनी कवणीए ठाइं असत ऐसें नेणवैल म्हणौनि चैतन्य-मृत्तिकेचीं दोनीं नांवें घेतलीं "—सं. प्र.

" मैळे "—" मृत्तिकेचा ठाइं केवळ दुःख होए तेंचि मैळणें । वांचौनि केवळ दुःखें मैळे म्हणितलें तर तेंचि दुःख कवणिए ठाइं असे ऐसें नेणीजैल । म्हणौनि प्रपंच परमाणु जो मृत्तिका तयाचा ठाइं असे । तें जाणावया मृत्तिका पर्यंत मैळे म्हणितलें । "—सं. प्र.

" चैतन्यासवें जीव "—" चैतन्यासरिसा जीव म्हणितलेया तयाचेनि आधारें । तर आधारचि कां म्हणावा । नाः जीव पंग अंधळा यातव । स्वातंत्री नाहीं : तर आंधळा कैसा। नाः त्रिविधा कर्मांचें ज्ञान दर्शन तें कांहिंचि नाहीं म्हणौनि । आज पंगु म्हणजे पांगुळाः तयासि आगांतुकाचे अनारब्ध आन अनारब्धाचें प्रारब्ध करावेया चालि न करवे यातत्र । एवं संलग्नावेगळी जीवासि गतीचि नाहीं । डोळसाचा हात धरीलेया वांचौनि अंधासि गतीचि नाहीं तैसा ठावो । कां जें तयासि त्रीविधा क्रियाचें ज्ञान दर्शन असे म्हणौनि । एवं सकळ क्रियाचे विज्ञानें आन जैसजैसा उल्लेखु करी तैसा तैसाचि जीवासि उपजौनि क्रीएसि प्रवर्ते म्हणौनि तयासरीसा म्हणितला । "—सं. प्र.

" मृत्तिकापर्यंत मैळे "— " चैतन्यपर्यंत उजळे तथा मृत्तिकापर्यंत मैळे या दोनी समानत्व नापजे । कां जे जीवाची अधमति ते सर्वदा । तीएतव असंत जैसे जोडि तैसे जीव संत न जोडि । जेतुलीं पापफळें तेतुलीं पुण्यफळें

नाहींतिः म्हणौनि मैळे हे बाहुल्यें आन उजळे तें सकृत जाणावें। संलग्न आपण मैळत उजळत असे । आन मुख्य चैतन्ये परमेश्वराचीए प्रवृत्तीतव आपुलीया विभागा संलग्नासि वासनाबंध लाविला असेः म्हणौनि आपुलेया सरीसें जीवातेंही चतुर्विध कर्मफळें फिरवीत असे । जैसा तराळें अपराधियापासि नेयावया तेणेंसि आपणासि हातखोडा घातला तैसा ठावो । ”--सं. प्र.

[ कर्माचरणि संलग्नाचेनि आधारें जीव चैतन्य मृत्तिकापर्यंत उजळे मैळे। ते कर्माधार इंद्रिया मनातें चेष्ठवि तेव्हेळिं जीव क्रीएसि प्रवर्ते । कर्मा वेगळें संलग्नाचें चेष्टकत्व न घडे । तें तैसेंचि । म्हणौनि आधिं कर्म पाहिजे । तेंचि ऐसें घडत असे । जे अच्युताचा अज्ञानी नीफजलें अन्यथाज्ञान तें स्वर्ग नरक कर्मभूमी मोक्ष या चतुर्विधाते आपजवित असे । तर तेंचि कैसे आपजवीपां । नाः परमेश्वरें दिधले ज्ञान ते जीवें आपुलेनि दोषें दवडीले । तेणे अज्ञान जाला । तीए अज्ञानि अन्यथाज्ञान नीफजले । आन चारि पदार्थ यथार्थज्ञानें उमटविले होते तो बोध जाताचि तेथ अन्यथार्थीचा अन्यथार्थ उद्भवला । तर तोचि कैसा । नाः जीव देवता प्रपंच ए परमेश्वर नव्हेति ऐसे जें होतें तें गेलेया तयातेंचि परमेश्वर म्हणो लागला । आन ईश्वराते तयासारिखें मानुं लागला । आन देवतांचीं साधनें अंतर्याग ·बहिर्याग तेंहि करुनि ईश्वराचें पावन असे ऐसे निर्धार उल्लेख करितां तयाचे संस्कार जीवीं होति तेचि क्रिएसि प्रतिकारणरुप असत । पर तयाचे लेप न लगेति । कां जे प्रथमसृष्टि लीलावशाचीचि असे म्हणौनि। एवं शारीर वाचीक मानसिका क्रियांचे संलग्नासि जाणणें असे । यातव दुसरीए सृष्टीसि संलग्न जीवासि तैसीचि वासना उपजवी। तीए तव आगांतुकें कर्में नीफजेति ।·तयातव जीवातें चेष्टउनि क्रीया करविती । अनारब्धें कर्में होति । तयाचि संलग्नाचेनि चेष्टकत्वें संपुर्ण क्रिया होउनि प्रारब्धकर्में होति असत । लेप तेही तैसे तैसे लागेति । तयातव चतुर्विध कर्मफळें होति । तेथौनि पुढां प्रवाहो सृष्टिरचनेचा चालों लागे । ” सं. प्र.]

१४ “ चैतन्यपर्यंत ” —“ कर्मभूमिचिया ठाइं मनुष्यदेहावरौति सकळ देवतांचीं फळेंपर्यंत चैतन्या उजळणें आति । उजळणें ·तें विद्याक्षाळणें करूनि

चोखट होउनि फळानंद भोगणें। चैतन्यविद्यावांचौनि खालिल विद्यांसि क्षाळण नाहिं। ” “ संतें उजळे : असंते मैळे। उजळणे ते सुखभोगा वाचकः तथा मैळणे तेंही दुःखभोगा वाचक। भोग तो जीवासीचि होए। संलम्रासि नव्हे। पर तोही क्रिया सारिखीचि भोगितांही संलम्रासि दुःख नाहीं। जैसा लोहेसि अग्नि पिटितां दीसेः पर तया घनघाओ तो लोहावरि बैसे। अग्नीसि कांहिचि नाहीं तैसा ठावो। ”--स. प्र.

“ उजळे ”--“ उजळणे ते संत कीएची आगांतुकें अनारब्धें कर्म चेष्टवी या वाचक। जीव दुःखीं मैळे आन सुखीं उजळे। जीवासि जैसा फळयोग तैसा संलम्रासि नाहीं। मा तर तयाचेनि सुखे सुखः दुःखे दुःख म्हणितले ते कैसे। ना : जैसे मैत्रासि भाग्य आलेया तयाचेनि ममत्वे एकासि समाधान वाटेः पर अष्टभोगाचे सुख सभाग्यासि जैसे होए तैसें एरा मैत्रासि नव्हे। तैसीचि एकाधि आपत्त ( आपत्ति ) दुःखभोग शारिरीं जालेया तो जैसा दुःखीया होए तैसा मैत्र नव्हे। पर खेदातें पावे। तेणें न्यायें जाणावें। ” —सं. प्र.

“ चैतन्यासवे ”—“ चैतन्यासरिसा म्हणजे तयाचेनि आधारे। कां जे जीव सर्वदा परतंत्र। संलम्राचा जीवासि आदिभावो सर्वदा असे। आन तया-चेनि चेष्टकत्वें सकळ क्रिया जीव करीति। ”—सं. प्र.

[ चैतन्यासरिसा जीव चैतन्यमृत्तिकापर्यंत उजळेः मैळेः पर लेपाधिकार्या तथा भोग तो जीवासीचि। एरां तदभिमान तो वृथा। ]

१५ “ आनाचा करणा ”—“ अन म्हणजे जीव। तयाचा करणा संल-म्रासि अभिमान। तो वृथा। कां जे चैतन्य तें लेपाधिकार्य न व्हौनि पर सुखदुःखें सरीसें भोगी। जीवाचेनि भोगे तयासि भोग। तोचि लोहोंसि अग्नि पीटितां दीसे। पर घनाचा घावो तो लाहोचि वरि बैसेः तेणें न्यायें सुखदुःखाचा अधिकार्या तो जीवाचाचि। मा तर एरां वृथाचि होइल। ना जैसा कव्हणी एक वाराणसी घोडेया वळघौनि गेला। ते क्रिया दोघी केली। पर पुण्य तें कोणा। नाः तें जीवासीचि होए तैसा ठावो। ”—सं. प्र.

[ तमाबाहीरि लोटीतां आदिमळ लागतांचि जन्म पातला । तेणें जन्मलेपणें व्यापकाचेनि आधारें क्षेणपर्यंत आदिमळेसि शुद्ध असे : मग मैळे । म्हणजे प्रपंचरचनेसि वासना उपजे । तेणेंचि आधारे प्रपंचाते रचीति । " ]

१६ " मग "—प्रपंच रचनेचि वासना उपजे । मग जीव प्रपंचातें रचीति । "—सं. प्र.

" प्रपंचाते रचीति "—मागे सूत्रे ७-ते-९ वर दिलेल्या टीपांचे पुनरावलोकन केल्यास अर्थ सुलभ होईल.

" काइ स्थूलसूक्ष्म अवघाचि रचीतिः आन काइ ·एकेचि वेळें रचीति । नाः मळ घेति म्हणितलेया सूक्ष्म रचि : आन स्थुळाचें निराकरण । एक मळ करुनि तयाचां ठाइं तादात्म्यक पावलेया दुसरेया मळातें प्रवर्ते । ऐसें उत्तरोत्तर मनुष्यमळपर्यंत तादात्म्य पावलेया दोही बुद्धिसामर्थ्यै जाए । माएनें मळ रचावेया दीधले होते ते मळपरत्वे तुटत तुटत सेवटीं नीशेष नाहीं होए । आन संलग्नासि मनुष्यमळपर्यंत जीवाचे दर्शन होतें तेंहीचि होए । तैसेंचि जीवासि संलग्नाचें दर्शन मुळापासौनि अन्तीं काहींचि नव्हे । ऐसें तें सामर्थ्य आवघेंचि गेलेया जीव अंध होउनि असे । जैसी कोसकीडि आपुलालेया भोवतां कोसळा रचौनि कोंडलिचि राहे । "—सं. प्र.

" स्थुल प्रपंच रचावेयाचे सामर्थ्ये माएने दीधले नाहीं । कां जें मनुष्यमळापुढे कांहींचि उरले नाहीं । एवं स्थुळ प्रपंच सकळ देवताकृत हेंचि होए । कां जें फळे माया करी म्हणितलेया स्वर्ग नरक कर्मभूमि मोक्ष ऐसे या चतुर्विधा प्राप्ती कर्मफळाची रचना तेचि करीत असे । "––सं. प्र.

१७ "संस्कृतछाया"–किमिति रचयन्ति । अधोमत्यधोगत्यधोरतिवशात् । " कां रचिति "—" प्रपंचातें म्हणितलें तर तो सूक्ष्म । पर जीवातें संकोचिता मैळता ऐसियातेंचि कां रचीति । ऐसाहि रचिलाचि तया पाठीं नीच मळ बहुत संकोचिता मैळता तोहि कां रचिति । नाः जीवाचा ठाइं अधमतिभ्रए असे यातव तयासि नीचचि करूं आवडे । "––सं. प्र.

" अधमति "—पुढें १९ वें सूत्र पहावें. " रचीति म्हणजे मति । अधमतीनें मळ रचणेचि । रीगे म्हणजे गति । तादात्म्य म्हणजे रति । " " तर तेंचि कैसी: ना मळाचे आत्मत्वे दर्शन ते तंवचि जवं आणिके मळिं तादात्म्य होए। आत्मत्वे दर्शन म्हणितलेया कर्मेंद्रिए नव्हे । माएने सामर्थ्य दीधलें तयांत इंद्रिए चातुष्टयेचा वृत्ती असतः पर तया इंद्रियाचे आकार जीवासि नसेति । पर माएचेनि सामर्थ्यें मतित्रए मानसिके व्यापारे रचिति । तो स्वरुपावरि आकारला भासे । जैसें वस्त्र पांगरवीजे तयासारिखा स्वरुपावरि आकारला ऐसा भास मायासामर्थ्ये वाटे ।—सं. प्र.

[ " ऐसें मतित्रय मळ रचीलें तर तयासि कांहि काळ संख्या लागत असैल आन काइं । ना: जैसा पर्वता वरौनि वोहटळिं गुंडा लोटित तयासि तळवटा यावया वेळ न लगे तैसा: जैसें गंगोदक वाहिं पडलेया वाहोंचि लागे तैसा मनुष्यमळपर्यंत मतित्रयाचा वाहो लागे। पर अल्पचि काळे रचना होए । " " तैसाचि ऊर्ध्वमति जालेया वेळ न लगतां ऊर्ध्वमतीतें पावत असैल आन काइं । म्हणे ना: तो कर्मवशेंचि होआवा । वांचौनि माएचेनि सामर्थ्यें नव्हे । जैसा वोहटळिचा गुंडा वरि चढवितां बहुत कष्ट लागति तथा गंगोदक उफराटें चालवितां आपार सायास लागति तेणें न्यायें । जीवाचे अधमतित्रए नासौनि ऊर्ध्व करूनि स्वानुभूति मोक्ष देयावा ऐसीचि ईश्वराची प्रउर्ती असौनि जीवासि ऊर्ध्वगति पावतां प्रयत्नपूर्वक शारीर मानसीक कष्ट लागति असत। तैसेचि कर्माहार्टीसिहि कर्माचरणीं जे कष्ट होति तेहि जाणावें । "—सं. प्र. ]

१८ " तैं त्यास सामर्थ्यें आति ।–" " तै म्हणजे सृष्टिकाळीं । त्या म्हणजे जीवासि । सामर्थ्यें म्हणजे करीजे ऐसी शक्ति । आति म्हणजे असे । " " एवं माएनें सामर्थ्यें दीधले: तेणें करूनि अधमतित्रए वेळ न लागतां सकळ मळ केले : एवं सृष्टिरचनेसि जीव आदि जाला : तमाचीया प्रपंचासिही आदि जाला । "

[ " जीव जन्मलासांतां क्षेणपर्यंत शुद्ध असे : मग मैळे । प्रपंच रचावा ऐसी वासना उदयातें पावे तेंचि मैळणें । तैसी वासना उपजलेया जीव प्रपंचातें रचीति । तें पुढिलें तीन्हीं वाक्यें प्रपंचरचनेची जाणावीं । " ]

१९ " नाहीं तेंचि एक–" " तैसें म्हणावयाचा कवण हेतु । ना नव्हतीए रचनेचा नवलाव असे या तव । तर तोन्चि कैसा । ना जो मळ रचीला तयासि दवतेसारिखा आकार नाहीं । तथा गुणाभुतासारीखाही नाही। आन परमाणुचाहि रचिला नव्हे । मग तो मळ जीवावर वस्त्रवत म्हणावा तर ' गुळ-हारियाचेनि दृष्टांते जीवस्वरूप प्रपंचामध्ये कालविले असें म्हणितले । आन तै सारिखा कर्म मळावरि तर एत असे । ऐसा रचनेचा नवलाव । तेचि मळ बोध देतां तथा अपरोक्ष संचरितां ' बाबुळीचेनि दृष्टांते ' परते सारावे लागति आन ' खारणीचेनि दृष्टान्तें ' तर सामान्य ज्ञानीं क्षाळणे लागेति । इत्यादि प्रकारीं नाहीं तेचि एक म्हणितले । तयाची रचना बुझावेयां गंधर्व-नगराचा न्याओ दीधला । " —सं. प्र.

[ गुळहारियाचा दृष्टान्त—" कवणी एक गुळहारी असेः तो गुळ करी । तो उसाचा रस काढी: काहिलिये घालीः तळीं अग्नि लावीः रस कढेः चाटसिया ( पळी ) करुनि मळी फेडीः वेगळी करी । मग आणिक भांडियां घालीः द्रव असे तें बद्ध होए । मग हातीं धरुनि आणिका ठायां नेयावया योग्य होए । "

बाबुळीएचा दृष्टान्त—" कव्हणी एक तृषावंत वाटां जात असेः तव बरवी जळे भरली विहिर देखे । पर पाण्यावर कण बाबुळी आली असे । मग तो ती बाबुळी हातें परती सारुनि उदक घेः मागौति बाबुळी तैसीचि मिळे । "

खाराणीचा दृष्टान्त––" कव्हणी एक निजला असेः तो आंतुरणीं मुती । मग स्वप्नाचेनि भ्रमे म्हणेः मी दारां गेलाः सागळ घेतलाः शौच केला । चइला ( जागा झाला ) तव लटके । खाराणी ती साच । तें धुतलियावीण न फिटे । " ]

२० "गंधर्वनगराकार—" मा गंधर्वांचीं नगरें तर दीव्यरुप सतसीद्ध (स्वतःसिद्ध ) असतां तीयें काइं जनासि दाखवीते असत । ना नव्हेतिः यातव तिए नव्हेति । तर जयासि उपमा दील्हि तियें कवणें । नाः अकस्मातचि मृत्तिकेचि निमिषामाजि रचीति । तेथ हाट चौहाटे नानापरीचे उद्यमीः व्यवसाइः क्रए विक्रए करिति । ते वृक्षांचे मांदाडेः हस्तिचे कोंकाटः वासरुवांचे हींस आइकों एति । ऐसें तें गंधर्वनगर दृष्टीचेनि मानें दीसे । तेंचि पाहात पाहातां नाहीं होए । तैसा सुक्ष्म सृष्टिकाळिं दीसे । संहारीं असत्याभाव होए म्हणौनि तयाची उपपत्ति दीधली असे । तर वीश्वमळासि कां दीधली । ना तो भूताचेया कारणांचा रचे । तयासि विश्वेचा आकार नाहीं । नाः जर जीवाचा म्हणावा तर तोही नाहीं । ऐसे नव्हेती नवलरचना होए । "—सं. प्र.

"विश्वमहं ऐसें बुझे "—" आतां विश्वाचा मळ तो भूतांचीं कारणें केवळें म्हणितलीं तर तींए कवणे न्याये जाणावीं पां । नाः जैसें कापुसाचें कींजल्क अतिसपुर तैसीं केवळें कारणें लेखावीं । मग तयाचें तंतू कीजेति । तैसीं समळें भूतें जाणावी । अथवा गहुंस्थानीं भूतें । तयाचा पोटीं अतिसपुर सोजीएचे कण असत । तैसीं भूताचीं कारणें असत । मग जैसें सोजीएचें अमृतफळ ( घारगा ? ) कीजे तैसा भूतांचे कारणाचा विश्वमळ रचे पर विश्वेचाचि ठाइं भूतांचीं कारणें असत ऐसें नाहीं । "—सं. प्र.

[ विश्वमळापासून मनुष्यमळापर्यंत अनुक्रमें चार अवस्थानीं होणारी परिणति आणि त्यांचा कार्यकारणसंबंध पुढें सूत्र ५-६-७ यांत अनुवादला आहे. तीं स्वरूपें वटबीजाचा न्याय देऊन स्पष्ट केलेलीं आहेत.

" एणेंचि अर्थें कार्यकारण संबंध असे । तोचि वटबीजाचेंनि दृष्टांतें जाणावा । तर तोचि कैसा । नाः वटस्थानी समळें भूतें आठांचा ठाइं असतः सीएची । मग तया वटाचें बीज अतिसपुर वटफळांत निफजे । तैसीं भूताचीं कारणें तयाचा विश्वमळ होए । आन वटस्थानीं प्रकृतिमळ । तया वटाचिया पल्लवशाखा । तिए स्थानीं विकृतिमळ : तथा विकृति विकृति मळ जाणावे । " सं. प्र. ]

२१ " अष्टधा प्रकृति रचि– " " कारणरूपें विश्वमळीं तादात्म्य पातलेया आपणेयातें उघडे देखौनि जीव पूर्ववत अष्टधा प्रकृतिमळ रची ।" " भैरवा-चेया मळाते आष्टधा प्रकृति म्हणितले । तयाचा ठाइं गुणभूते तेहि आठचि असत । एकएकाचा ठाइं एकएकचि भूत असे । एकप्रधानः सात अनुषंगिकें। ऐसेयातें एक भूत म्हणिजे । तैसीं आठ भूते आठां ठाइं असत । या आठां भूतांचा एकमळ । तया आठां मळांचा अष्टधा प्रकृति मळ । तर प्रकृति म्हणजे स्वभाव । तोचि अष्टभैरवाचा । तयाचा स्वरूपीं एक प्रधानः सात अनुषंगिके ऐसीं अवघींचि आठ भूते असत । तया अष्टभैरवाचा स्वभावातें प्रकृति म्हणितलें म्हणौनि तेंचि नांव तयाचया मळासि जालें । "

" तो अष्टधा प्रकृतिमळ । तयांत एकेमळीं चोसष्टीं भूतें । ऐसे ते पृथकमळ आठः तयामध्ये जीव मैसीं पाणीयाचेनि न्यायें ( काजळ व पाणी ) एकत्र कालवला असे । जैसी अविद्या आन जीव कालवली असत तैसाचि अविद्यायुक्त जीव विश्वमळीं कालवे । मग विश्वमळेसि प्रकृतिमळीं तेणेंसि विकृ-तिमळीं कालवें । ऐसा मनुष्यमळपर्यंत कालवत कालवितां स्थूळें प्रपंचीं कालवे । "

" जव जव मळिणत्व तव तव जीवाचें सामर्थ्य उणें जाणावें । एवं आठा मळाचे मानसिकें कर्तव्य ते माएचेनि सामर्थ्ये आकारेति । तया आठांचा एक भेद करुनि तयांत रिगेः तादात्म्य पावे । तव मागिलाचें दर्शन होएः आन आपणेयाते उघडेया देखौनि अनेकधा प्रकृतिमळ करावेया प्रवर्ते । "

"आठां भैरवांचा ठाइं भूते असत । तयाचाचि विकर ते विकृति होए । तोचि सपुर धोंगडा कवणें न्यायें जाणावा । ना : जैसा गहुं पदार्थ तर एकचि असे । पर तयाचें अमृतफळ तथा मांडाः पातिः पोळी रोटी जैसी सपुर धोंगडें पक्वान्नें होति । जैसा सोजिएचा उंडा लहानचि । पर कर्तव्यते अनुरुप थोर पसरौनि मांडा होए । आंत कणकीचा उंडा थोर तर असेः पर तयाचा मांडा नव्हे । तैसा प्रपंच आठांचाचि ठाइं । "––स. प्र.

" अनेकधा विकृति "—" अष्टधा प्रकृतिमळीं तादात्म्य पावलेया आपणातें उद्भव देखौनि जीव पूर्ववत अनेकधा प्रकृतिमळ रची । मागिला विकारापासौनि विचित्र म्हणौनि अनेकधा । विचित्रे विकारवंतें भूतेंचि आठांचा ठाइं होति । तया मळांचा ठाइं जेंचि विकृतिशब्दे विकारातें पावेति ते मळ शेषशय्या ब्रम्हादिकाचे जाणावे । तर तेचि कैसें रची पां । ना : आठांचा ठाइं गुण-भूतें होतिः तीये परमेश्वरप्रवृत्ती द्रवली । मग तयाचेया कारणाचा विश्वमळ रचिला । आन समळ भूतांचा प्रकृतिमळ घेतला । त्या उपरि विकृतिमळ रचीति । विकृति शब्दें विकार मळपरत्वे विचित्र होत गेला तोचि जाणावा ।"
—सं. प्र.

[ विकृति म्हणजे वस्त्रचि कां म्हणितले । ना: तयाचा हेतु ऐसा । वस्त्र ते तंतूचे होए । आन तंतु ते कापसाचे होति । तर कापुसाचा ठाइं जैसें अतिसपुर कींजलग तार असतः तैसीं भूतांचीं कारणें तयाचा विश्वमळ केला । तयां बहुतां कींल्जल्काचा जैसा तंतु होए तीए स्थानीं समळे भूतें । तयाचा प्रकृति-मळ केला । मग बहुतां तंतुवाचे वस्त्र होए: तीए स्थानिं अनेकधा विकृतिमळ बोलीला । मग मळपरत्वें माएचे सामर्थ्यें तुटततुटत जाए तैसतैसी जीवाचि कर्तव्यता धोंगडी होत जाए । तोचि तया भूताचा विकार । तथा विकारातें वस्त्र म्हणजे विकृति म्हणितलें । मग तयाहि विकृतिवस्त्राचे भेद सपूर धोंगडे शेषशय्या ब्रम्हा इतुके जाणावे । मग तयाहि खालौतें बहुतचि भेद असत मा तर भूतें आठांचि तीएचि असतां बहुत भेद होति ते कवणे न्यायें कैसें जाणावें पां । ना: एथ उपपत्ति कांतियाचि ( विणकरी ) " जैसा तो तारुण्य-दसेंसि नवीये दृष्टीतव अतिसपुर तंतू कांते । तयाचें अतिसपुर वस्त्र बहुतां मोलाचें होए । मग तोचि कांतिया तिसरीए चौंथीए अवस्थेंसि जरठत्व पावे तवं दृष्टीहि मंद होए । आन हाताचें कोमळत्व जाउनि नीबर होति । तयातव मागिला सारीखे सपुर तंतु न कांतवेति । धोगडे धोंगडें कांते । तयाचें वस्त्र धोंगडें मोलहीन होए याचिपरी मनुष्य मळपर्यंत पृथक मळीं हाचि न्यावो सपुर धोंगडेपणाचा जाणावा । सेवट मनुष्य मळाचा लेखावा । "

"मा: तर आठांचा कर्दम एकचि असतां आवघयाचा वर्ण सारिखा नसौनि विचित्र वर्ण मळींचें कां जाले । ना माएचेनि सामर्थ्यें मळपरत्वें भूतांची भागोत्तरी ते कैसी । नाः जैसी तांबेयांत कथिलाचीए भागोत्तरी तव कासें होएः तथा खापरसुताचीए भागोत्तरी तव तांबयाची पीतळ होए। मग उत्तम मध्यम कनिष्ट भेदें जैसजेसी भागोत्तरी देइजे तैसतैसीचि पीतळ नीफजे । जैसे सोनपीतळ रीरी (?) रासवट । तेणें न्यायें भूतांचि भागोतरीचे भेद उत्तरोत्तर मनुष्यमळपर्यंत भूताचेनि विकारे सपूर धोगडे मळ तथा वर्णभेद होत असति । "—सं. प्र. ]

[ विकृतिमळीं तादात्म्य पावलेया आपणयाते जीव उघडे देखेः मग अनेकधा विकृति रचि । तें बुझावेया चारीं न्याये दीधले । तर तेचि कैसे । नाः जैसा दुधाचा विकार दहिः तयाचा विकार ताकः तयाचाहि विकार आंब । जैसें हे एका पदार्थांचे चारी भेद । तैसेंचि आठां भूतांचा प्रपंच तो एकचि । पर तया भूताचेनि विकारे मळाचेंही चारी भेद जाले । दुधस्थानिं आठां समळा भूतांची केवळें कारणें । तयांचा विश्वमळ केला । मग दहींस्थानिं समळा भूतांचा आष्टधा प्रकृतिमळ निर्मीला । ताकस्थानीं भूताचेया विचित्र विकार जालेया अनेकधा विकृति मळ निर्मीला । मग आंबस्थानीं भूताचेया विचित्रा विकारापासौनि विकार जाला । तयाचा अनेकधा विकृतिविकृति मळ रचिला । मग तया विचित्रा विकाराचाहि विचित्र विकार अतिसइ जाला । म्हणौनि विचित्रा पासौनि विचित्र म्हणितला । एवं मळरचना विचित्रा पासौनि विचित्र मनुष्यमळपर्यंत केली । तीए सारिखी पहिली नव्हति म्हणौनि नाहींतेंचि एक म्हणितलें । ऐसे मळरचनेचे विचित्र भेद बुझावेया चौ थोवे । या वरि चारि वेळ गंधर्वनगराचे न्याव दीधले । वांचौनि थोवेपरत्वें समळांचा ठाइं प्रपंच असे म्हणौनि चारी वेळ गंधर्वनगराचे न्याए दीधले ऐसें नाही "-- सं. प्र. ]

२२ " गंधर्व नगराकार " " मळरचनेचे विचित्र भेद बुझावेया चारीवेळ गंधर्वनगराचे न्याव दीधले ऐसें जाणावें । "

" अनेकधा "-- " संख्याप्रकाराचें विषयीं धा बोलीजे। जैसे एक प्रकारक धा। दिप्रकारक द्विधा। अनेकप्रकारक अनेकधा। "

" विकृति विकृति "-- " विचित्रा विकारापासौनि विचित्र विकार जाले म्हणौनि विकृति विकृति ऐसे दोनी वेळ म्हणितले। "

[ " एवं विश्वमळापासौनि उत्तरोत्तर येक्षिणीचेया मळिं तादात्म्य पावलेया आत्यंतिक मैळे। ऐसा मळप्रकरणाचा उपसंहार केला। " ]

२३ " यापरि "--" अनुक्रमे विश्वादिमळ घेत घेत। "

" मनुष्य"--" मनुष्य म्हणितलेया कर्मभूमीचां सेवटलीए देवतेतें जाणावें। तर काइं देवतेंसि मनुष्य म्हणावे। नाः तीचया मळातें म्हणितलें असे। "

" पर्यंत "--" परौता। सेवट उरला नाहिं। "

" मैळे "--" ज्ञानसामर्थ्य जाए। ते गेलेया मागां आपणातें उघडे देखत होता तेंही एथ न देखे। तैसेंचि एराचेहि गेले। पर कर्माचें चेष्टकत्व करावया-पुरतें मुळापासौनि ठेविले तें तैसेचि असे। "

" एरासि म्हणजे माएवेगळें जीवासि करणें नाहीं। म्हणजे स्थूळ परमाणू रचतें नाहीं। कां जे फळें माया करी म्हणितलें। स्थूळ रचनेचें सामर्थ्य मळ-रचनेचया सामर्थ्यामिध्यें नाहीं: आन मळरचनेचे एरामध्यें नाहिं। "

" मनुष्यमळ जीवीं रचिलेयापाठीं माया स्थूळ प्रपंच रची। वांचौनि जीव स्थूळ प्रपंच रची हें न घडे। "--सं. प्र.

२४ " यापरि जीव मनुष्यमळपर्यंत मैळे म्हणितलेया विश्वमळापासौनि मैळत मैळत सेवटीं एक्षिणीचा मळीं तादात्म्य पावलेया आवघेंचि ज्ञानसामर्थ्यें जाए: तयासि माया चतुर्विध कर्मफळें रचौनि जो जीए फळीं होता तो तेथ घाली। " " मागां ( सूत्र ४ ) "लोटी" म्हणितलें तयाचा वीनयोग एथा-तथ्यें ए वंचनीं जाणावा।"—सं. प्र.

" चतुर्विध—पुढील सूत्र पाहावे. " म्हणजे तो अनुक्रमेंचि। ईश्वरासि नीकयावरि दृष्टी म्हणौनि ते अनुक्रमें घाली।"

२५ " जाति "—" सुक्ष्म जीवे केला । मग माएने स्थुळ रचौनि चतुर्विध कर्मफळे केलीं: साधनें ( आंतर्याग बहिर्याग ) तेचि दे। ' लोटी' म्हणजे जो जेथचा तेथ कीं रेखीलीए सुतारफळीवत। मग आवघे नीर्वाळलेयावरि फळी घाली। आन चैतन्यपरंपरा मोक्षफळा जाए।"—सं. प्र.

२६ "चतुर्विध कर्मफळ "-" स्वर्ग म्हणिएति इंद्रादिकांचीए ठाउनि भोगभूमिः पाताळीचीं मनुष्ये। स्वर्गशब्द सुखावाचक म्हणितला।" " नरक म्हणिएति मनुष्यदेहा खालौते जेतुलीं पापदेहेः जडत्व हा सेवट। जेतुला दुःखाचा लेप तेतुले नरकचि। जडत्वा परौते नरक नाहींति।" " संतें स्वर्गः असंते नरक।" " कर्मभूमि म्हणजे मनुष्यदेहवाचक। सकळाची निष्पत्ति ते कर्मभूमी कीं।" " मोक्ष तो त्रिविधा। ब्रम्हदीका शेषशय्यांसि ऐसी प्रतीती की आम्हीं पुण्यातव आलों पर पडो ना । आठ ( भैरव ) म्हणेति आम्ही नित्य ईश्वरचि। वरिल सुखबाहुल्येः विस्मृतिपैल तो मोक्षचि कीं केवळ सुख।—सं. प्र.

२६ " यापरी " — " न्यूनाधिक्यातिरिक्त म्हणजे न्यून नव्हे ना आधिक्य नव्हे एथापूर्ववत। म्हणजे पूर्वी होति तैसीचि रचे।"

" मागौति जैसी " — " जें माघां सांघीतली परी तैसी। प्रपंचाची रचना जैसी जाली होती : तया फळाचा निर्वाळ जैसा निर्वाळला होता : साधनाचीया प्राप्ति जैसीया जालिया होतिया : ऐसी सृष्टीची रचना होति।"

" मागौति म्हणे पूर्वी होती तीएचा संहार जाला। पुढतीं तेचि जीवः तोचि प्रपंचः तीयेंचि फळें साधनें युग संवत्सर मास पक्ष दीवस तीथि नक्षत्र योग लग्न घटिका क्षेण। तीए क्षणीं जेयाचा जैसा जैसा आहार विहार : तेचि स्वर्ग मृत्यु पाताळीं वीचीत्रा भेदीं वर्तत होते : तैसतैसी रचि। मग पाचां महद्भूताचें वर्तन साहीं रुतूंचा ठाइं तें जैसें होतें तें तैसे रचि। इत्यादि आनेक प्रकारक मागौति येणें शब्दें पूर्विल तेचि साधीलि। म्हणजे पूर्वी होति

तैसीचि एथावत् रचना होए। ऐसा हा प्रवाह रचिलीए सृष्टीचा चालत असे। मागील मूळसृष्टि सारिखीचि एथावत रचना होए ऐसें नाहीं। "—सं. प्र.

[ "ऐसी सृष्टि रचौनि माया नीरंतर परमेश्वराची प्रवृत्त वोळगतीचि असे।" ]

२७ "माया"—"ईश्वरीचि व्यापारती शक्ति। तेचि त्र्यंशीं नीत्य-संबंधे समवाएत्वें पातली असे। परमेश्वराचीया तीन्ही प्रवृत्ति जाणौनि तयाचें कार्य शीघ्र करी।"—सं. प्र.

"परमेश्वराची प्रउर्ति"—"प्रथम सृष्टि रचनेची प्रउर्त। उल्लेखु मोटका महरैजेना। तव तीएसि (माएसि) सृष्टि रचूं सरे। एथा ईश्वराची प्रउर्त तथा तीएचा व्यापार म्हणितलें म्हणौनि। आन व्यापारीं प्रवर्तली असतांही वोळगेसि खंडना नाहीं। मग दुसरी प्रउर्त अवतरणाची उपजे। तीयेचा भाव जाणौनि शुद्धे स्वरुपें त्रिप्रकारका अनंता अवताराचीया मूर्ति रचौनि स्वरुपें विभागौनि पूर्णत्वें सकळाचीहि प्रवृत्त वोळगतचि असे। सेवटिं संहारीची प्रवृत्त उपजे। तीएते जाणौनि सृष्टिसंहार करुनि पहिलें ईश्वराची प्रवृत्त वोळगत होती तैसी नीरंतर वोळगतचि असे।"—सं. प्र.

"प्रवृत्त ते स्वातंत्रियेचि उपजे आन स्वातंत्रियेचि भंगे: वांचौनि कव्हणीं उपजवीतें नाहीं। तथा भंगती तैसेंहि नाहीं। मग राहे ते इच्छा।"—सं. प्र.

"ॐ ळगे"—"वोळगे म्हणजे वेंचलेपणें तया उल्लेखाची वाट पाहे। एथा आंगवळेकार सेवक। तो जैसा धुरेचा उल्लेखु पाहतां जाणत असे आन तैसीचि उचित क्रिया वोडवी: तयासि मुखें व्यापार सांघणें न लगे।"

"माएनें परमेश्वर स्वरुप देखिलें नसतां तीए अव्यक्तींची प्रवृत्त ते कैसी जाणे ये पृच्छेचा परिहार करितां गो स्फुरणवत जाणावें। तर तेंचि कैसें। नाः आंगावरि मासी गोमासी बैसलेया तेंतुकेंचि आंत्र हालवुनि उठवीः अथवा संलग्न उल्लेखु उपजत्री आन देहाचीं सकळ गात्रे व्यापारों लागति। एहीं न्यायीं माएसी परमेश्वर स्वरुप आत्मधर्में जाणवीति। वांचौनि ते सर्वथा नेणें।"—सं. प्र.

# ६ महावाक्य

[ या सहाव्या प्रकरणांत ९ सूत्रें आहेत. त्यांचे दोन सरवळे केले असून पहिला 'परमेश्वरनिर्धार' यांत पांच, आणि दुसरा 'शक्तिनिर्धार' यांत चार अशी सूत्राची वांटणी केली आहे. ]

१ " जीवप्रपंचुव्यतिरिक्त "--" व्यतिरिक्त म्हणजे वेगळाचि । जीवाची व्यावृत्ति कां केली । तो सर्वशौच्य आन तया सामर्थ्य नाहीं म्हणौनि । जीवाचें स्वरुप ईश्वरें व्यापिलें असे । पर तें केवळ स्वरूपातें व्यापिलें असे । तेंचि कैसें । नाः जैसें चणे उदकांतु घातलेया बाहीरीं भीतरीं उदकें व्यापीलें परि तेयाचे नाहींपण ना चुके ना मोडेचि । तैसे ईश्वरस्वरुपे जीवस्वरुप व्यापितांहि तेयाचें जीवपण न फिटेचि । तै ईश्वर तया वेगळाचि । तरी जीवासि ईश्वराची प्राप्ति जाली म्हणों पां । म्हणे नाः । तो मीसळलेया वांचौनि मिसळे ना । म्हणौनि तो जीवाही वेगळा । जैसे एका घरीं बापुपुत्रु असति । एकत्र उठेति बैसेति खाति जेविति पर वेगळेचि । "--म० वा० प्र०

" प्रपंच "--' तरी प्रपंच कां सांघीतला । नाः हा जीवाचीए पांति सांघावाचि लागे । कां पा । प्रपंच जीवें केला आन यावेगळें जीवासि असणेंचि नाहीं । संहारीं तरी माएचां ठाइं असेः आन सृष्टी रची तरी प्रपंचीं असें । म्हणौनि जीवाचीए पांति प्रपंच सांधीतला । तरी प्रपंच म्हणजे लटका । मा या लटकेया वेतीरिक्त ईश्वर वेगळा हे काइ म्हणावें असे । "--म० वा० प्र० ( सं. सूत्रें ७-८-९-११ यावरील टीप पाहा ).

२ " नित्य "--संहारण परिच्छेदांत ' नित्यानित्यवर्गाचें ' स्पष्टीकरण केलें आहे. " काळें उपायें न नसे तें नित्य । अविद्या आद्यमळ ईश्वर उपायें करुनि नासीत असति । जीव देवता ईश्वरां नासिताही परि न नसति । "

" केवळ "--" दुसरें नाहीं तें केवळ । जैसे झरीचें उदकें: जैसा मानससरोवर : जैसें गगनगंगेचें उदक । याचां ठाइं दुसरें नाहिं । हे पदार्थ चोखट निर्मळचि । तैसा जीवु केवळु । ईश्वरुहिं केवळु म्हणितला असे परि तो जीवातें

केवळा करी। आन ईश्वरीं दुसरें नाहिं। आन ते केवळत्वें आसों सकति। जीव केवळ परी अविद्या आद्यमळ लागलेचि असति। साधने करुनि जीव ईश्वरस्वरुप देखतचि असे : आन स्वरुपीं मेळविला मीळत असे म्हणौनि केवळ।"

"अनादि"--"आदी नाहीं याते अनादि बोलिजे। ईश्वरासि आदी नाहीं: जीवा देवतांची आदी ईश्वर नेणतिः ईश्वराची आदी जीवदेवता नेणतिः म्हणौनि हे तिन्ही पदार्थ स्वतंत्र अनादीचे। जैसीं वडाचीं बुडे रोउनि वड-पिंपळ लाविजतिः जैसे आंबेयाचे आरव लावीजतिः मग ते साखा-पालवी विस्तारलेया पुसतीः हा होएः एसणालीं पुण्ये कोणी केलीं: नाः आमुकेनि तमुकेनि केलीं कीं। परि बीज ते याचे कृत नव्हेः ते अनादीचें: तैसा ठावो कीं।"--म० वा० प्र०

"अविद्या"--"भावरूप अज्ञान याते अविद्या म्हणितले। सृष्टीमध्ये जेतुलें भावलें असे ते भावरूप अज्ञान। जैसा अंधकारु आन धू। दिवा लाविलेया अंधकारु जाए : परि धू न वचे। आन डोळां तरि दीसे। तैसे ज्ञान जालेया भावरुप अज्ञान जाए : परि अविद्या न वचे। ते प्रकासे परि नासे ना। ईश्वराचेनि सामर्थ्येवांचौनि न नसे म्हणौनि अविद्या।"--म० वा० प्र०

"युक्त"--"तरि युक्त म्हणजे काइं। ना जीव आन अविद्या कालविली असति : त्याते अविद्या म्हणितलें। जैसें मसी आन पाणी। अक्षर तेंही मसीचे आन दीसति असे तेंहि मसीचि। तैसे जीव आन अविद्या कालविले असति परि दीसतु असे तो जीवचि। अविद्येचे दर्शन चैतन्याही नाहीं : जेणे देखे ते जीवत्वेचि देखे। अविद्या फीटलेया अविद्येचेंही जीवाचेही दोहीचेही दर्शन नाहीं। तरि ते जीवासरसीं कैसी फीटली। ना जैसा तांबेयाचा ठाइं कळंकुः जैसा तांदुळाचा ठाइं कोंडा : साळी नीगे : चीकभरी होएः मग दोनीं नीबरे होति : तरले फीटलेया तांदुळ म्हणिजे। मग तांदुळ सडिजे। कोंडा वेगळा कीजे : तांदुळ वेगळा कीजे : तैसी अविद्या वेगळी केलेया जीवातें अविद्येते कव्हणींचि न देखे। तरि अविद्याचि म्हणजे काइं। नाः जीवातें आवरितीः

मैळती: जैसे घटे उदक आवरिले असे : तैसा इया जीव आवरिला असे। तरि मैळती कैसी। ना: आद्यमळ लावावेया हेचि कारण जाली असे। सकळ मळ घेयावेया हेचि कारण जाली असे। सकळ कर्में करावेया हेचि कारण जाली। अनंत दु:खे भोगावेया हेचि कारण जाली। सृष्टीमध्ये हेचि आवघी रचली असे। हे नासे तै संसार नासे। म्हणौनि जीवाचीया वोखटेया गोमटेया हेचि कारण होत असे।"—म० वा० प्र०

"वस्तु"—"सारभूत पदार्थ। आवघेयाचे सार म्हणौनि वस्तु म्हणितले। जैसे काष्टामध्ये चंदन सार: पाषाणांमध्ये शिरसाळ सार: वस्त्रांमध्ये पाटाऊ सार: लोहामध्ये गजवेली सार: नरांमध्ये बत्तीस लक्षण पुरुष सार: तैसा ठावो कीं। म्हणौनि देवताहुनि जीव सारभूत: आन जीवाहुनि ईश्वर सारभूत।"—म० वा० प्र०

"एक अति"—"तरि एकु कां म्हणितले। ना हे एकवचनीं बहुवपण: जीवाची रासि एक म्हणौनि एकी म्हणितलें। जैसें मिरी: पोफळ: आलें म्हणितलेया काइ एक मिरी: पोफळ: आले होए। ना: हे एकवचनी बहुवपण: म्हणौनि एकचि आति म्हणितलें।"—म० वा० प्र०

"ते जीवशब्दें बोलिजे"—"ते म्हणजे जीवाचे स्वरुप। तरि जीव म्हणजे काइ। ना: जीवविला जीए: आन मारिला मरे म्हणौनि। आन कां जीव। ना: सर्व शोन्च्य म्हणौनि जीव।" "तरी शब्दे बोलिजे म्हणजे काइं। ना: अवतरला ईश्वरु शाब्दीयाप्रती जीवाचें स्तीत्व (अस्तित्व) शब्दें सांघत असति। ईश्वरु शाब्दीयासि शब्दें बोलती। कां पा। जे अनुभवें जाणावा।" —म० वा० प्र०

३ "विश्वरूपाचिए ठाउनि"—"तरि विश्व म्हणजे काइं। जीव देवत प्रपंच मेरुमेखळांत पृथ्वीभीतरी सामावली असे म्हणौनि विश्व। आन क विश्व। ना: ईश्वरप्रवृत्ती आद्यमळु लावीला। मग आवघेया आधीं जीवें विश्व मळ घेतला मग सकळ मळ घेतले।, म्हणौनि विश्व। आन कां विश्व। ना स्थूलासि कारण म्हणौनि विश्व।"

" तरि रूप म्हणजे काइं। ना: विश्वा एव्हडें रूप म्हणौनि विश्वरूप।"

" तरि पासौनि म्हणजे काइं। ना: या विश्वरूपा परौतां 'प्रपंच नाहीं। तेया परतें चैतन्य तें अव्यक्त आन निःप्रपंच कीं। तेयाते वीदेह म्हणितलें ( संहारण प्रकरण पाहावें ) म्हणौनि।"--म० वा० प्र०

" मृत्तीकापर्यंत प्रपंचु बोलिजे "--" जड अजड याते मृत्तिका बोलिजे। भूमी तेही मृत्तिकाचीः वृक्ष तोही मृत्तिकाचीः मनुष्यें तियेही मृत्तिकाची।"

" प्रपंचासि विश्व आदिःआन मृत्तिका सीमाः मृत्तिके खलौता प्रपंच नाहीं।"

" प्रपंच म्हणजे काइं। ना तो अनित्यः नाशीवंतः आन मिथ्या। प्रपंच भलतेयापरि अभावरूप। जैसा लाघवीयाचा हातावरिल आंबा। सर्वेंचि दीसेः सर्वेंचि न दीसेः तैसा प्रपंच साचहि म्हणो नैए आन लटकाही म्हणों नैए। ईश्वरीचें एथार्थज्ञान जालेया लटका। परि देखीजत असिजे म्हणौनि साचु।"--म० वा० प्र०

४ " व्यतिरिक्त "--" व्यतिरिक्त म्हणजे वेगळा। जीव प्रपंचांत भावौनि रंजौनि असेः पर वेगळा। जैसा योगिया लोकांतु वर्ततु असे। तेयाचाचि देशः तेयांचेचि मठमंडपः तेयांचेचि घरः तेयांचेचि उदकः नीरंतर सेवितचि असे। पर वेगळा। तेयांचा सुखदुःखीं बाधीजेना। तेयांचा सुखें आल्हाद उपजेना। आन दुःखें खेदातें पावे ना। तेयांचेनि काइसेनही सिंपेना।"

" ब्रम्ह "--" ब्रम्ह म्हणजे काइं। ब्रह्न तर वृधौ म्हणौनि ब्रम्ह। ब्रम्ह म्हणजे थोर आन वृधौ म्हणजे वडिल।"

" माया "—" मोहक बंधक भ्रामक म्हणौनि माया।"

" आनंद "--" जेथ सुखा अतिशयो नीवर्तला तो आनंद। जैसा साखरेचा ऊसु मुळाः पानाः वाढेया पासौनि साखरचि। तैसें ईश्वरीचें केवळ स्वरूप आनंदाचेचि। जैसा कापुराचा पुतळा। आंत बाहेरि कापुरचि।"

" ईश्वरु "--" नीएंत ( नियन्ता ) म्हणौनि ईश्वरु।"

" त्रीअंशु "--" तीन्ही रूपें अंशें मीळोनि असती म्हणौनि त्रियंश। परि तीन्ही अंश समानचि नसेति। माएचा अंश ईश्वरस्वरूपीं हारपे। जैसा देहामध्यें मस असे। तैसी ईश्वरीं माया हारपौनि गेली। म्हणौनि जेतुला ठाइं माएचें स्वरुप झळंबलें असे तेतुलाचि ठाइं त्रीयंशता। जैसी त्रीशक्तींची मुदी। तांबेयाचा ठाइं कलंक असे तैसी माया। तिएचीया ठाइं अविद्या असे। रूपें स्थानीं ब्रम्ह। जे गुणधर्मी काइसेनि लिंपे सिंपे ना। सोनेंस्थानीं ईश्वरस्वरुप। जे आगाध नीत्य केवळ आनंदस्वरुप।"

" त्रीयंशु तरि एक कैसा। ना: वेगळा म्हणों नैए म्हणौनि एकु।"

" एकु आति "—" तरी एक म्हणजे काइं। ना तैसा आणिकु नाहीं। जैसा दुसरा सूर्यो नाहीं। जैसें दुसरें अमृत नाहीं। युक्त आन वेगळा हों सके ऐसा आणिक नाहीं म्हणौनि एकु। अवतरला तरि जीवाचा ईश्वरू करूं शके ऐसा आणिक नाहीं म्हणौनि एकु।" " अस्तित्वें असे म्हणौनि आति।"
--म० वा० प्र०

६ " शक्ति " —" सामर्थ्यवंता म्हणौनि शक्ति। ईश्वरी स्परूपाचेनि संयोगें असती। जैसा सर्पीं चंदन वेष्टिला असे। तेयाचां गुणीं जे लुब्ध जाले असती। तैसीया शक्ती ईश्वराचेनि योगें असति। कां पा। जे ईश्वरीचे स्वरूप आनंदमय ज्ञानमय ऐश्वर्यमय सामर्थ्यमय प्रकाशमय तेजोमय प्रेममय। ऐसें आनंद पद वाच्य म्हणौनि तेथें मुळे लागलीं असती। जैसीं वृक्षाचीं मुळें भूमीतें कडतरौनि लागलीं असती। तेयांची वोला तो पाणी पावलीया फळीं फुलीं सासिन्नला असे।"

" सकळै देवता "—" दीव्या प्रकाशवन्ता आन चेतना म्हणौनि देवता। सकळाही देवता ईश्वरीचा उल्लेखु जाणती। हें स्वरूपगत ज्ञान। सृजन अवतरण संहरण हे सकळ देवता जाणती। असामर्थ्या उगलियाचि असती। परि सृष्टीसंहार तो मायाचि करी।"

" गुणधर्म " -- " लावीले लागती म्हणौनि गुण। धरीले म्हणौनि धर्म, पर एक मूर्तिनिष्ट आन एक स्वरुपनिष्ट।"

."ज्ञानविज्ञान" — " तर ज्ञानचि म्हणजे जे जैसे असे तें तैसेंचि जाणिजे।" विपरीत ज्ञान वीज्ञान। तरि ज्ञानविज्ञाना जोडीगे कां पां घातिले। ना दोन्ही जडे आन प्रकाशवंते म्हणौनि। तरि एक अन्यथाज्ञान प्रकाशक आन एक एथार्थज्ञान प्रकाशक। तरि अन्यथाज्ञान प्रकाशक ते कवणाचे। ना: तें देवतांचें। तेयांचे ज्ञान पींडस्थेते ईश्वर म्हणे: मळाते जीव म्हणे: म्हणौनि अन्यथार्थप्रकाशक। तरि एथार्थप्रकाशक ज्ञान तें ईश्वरीचीए ब्रम्हविद्येचेचि थोर जाणिजे। "—म० वा० प्र०

७ " युक्त "—याचें स्पष्टीकरण पुढे सूत्र ९ चे अखेरीस केलेलें आहे.

८ " सौंदर्य"—"तरि सौंदर्य म्हणजे काइं। ना: अवयवे युक्त बरवेपण। जीए अवेवी जें बरवें तो अवयेवु बरवा। तैसें सकळ अवयव बरवे। हा एकु अवयवु पाहतां आणिका अवयवावरि दृष्टि न वचे। याते सौंदर्य बोलिजे। युगांत एकएक सौंदर्य असतचि असे। एक देशपरत्वें सौंदर्य। तें कैसे। मा: तुरुका विधलेया कानाचें न होआवें: बुटेया कानाचे व्हावे। कानडेया तेलंगेयाते थोरा कानाचें न होआवें सानेया कानाचे थोरलेया खोपेयाचें होआवे। म्हणौनि एक देशपरत्वे बरवेंपण। मनुष्यापसी मनुष्ये बरवीं। बरवेया मनुष्यापसी देव बरवे। देवापसी अवतार बरवे। एक अवतारयुक्त बरवे: एक लोकांतु बरवे। एक देवां वेधु लागे ऐसे बरवे। ऐसे सौंदर्य जीवाचां ठाइं नाहीं: देवताचां ठाइं नाहीं। हें ईश्वरींची आति। " —म० वा० प्र०

" लावण्य "—" अवएवा वेगळे उधाए तें लावण्य। श्रीमुखा वेगळे उधाए दंतपंक्तीवेगळें उधाए। तैसे अवएवापासौनि पुढां लावण्य उधाए। म्हणौनि अवएवा वेगळे काइं नेणो एक कोवळीकेची चुळळी: प्रव्हेचा उजाळु। सावरितां परि वोसंडत असे। जगाचेया डोळेया आणवत असे। मागौति मोहर घेवों नेदी ते लावण्य। "—म० वा० प्र०

" सौभाग्य"—" गुणेवीण पढियावो याते सौभाग्य बोलीजे। ईश्वराते कव्हणीं देखिलेचि नाहीं: ईश्वराचा एकही गुण नाहीं उमटला। परि तिही

भुवनें वेधिलीं असती । देशपरत्वें जातिपरत्वें जो जयातें वेधीयति तो तेयाते माझा ईश्वरु म्हणौनि पूजी । कव्हणी ईश्वरु म्हणे: कव्हणी कव्हणी कर्तारु म्हणे: ब्रम्हा विष्णु म्हणे: ऐसी रानीचीं गोंडें गोवळे आदिकरुनीहि तेया तेया ईश्वराचेया सौभाग्यातें नानापरी नेणौनि बोलाविते असती ।"
"तोकडेनि गुणे बहुत आवडी तें सौभाग्य"--म० वा० प्र०

"औदार्य"--"पात्रापात्र न पाहे । वीत ( विहित ? ) न पाहे । साना-थोर न पाहे । उपकार निरापेक्ष देणें ते औदार्य । आन दानि म्हणजे स्वसत्ता निवृत्ति आन परसत्ता करणे । तरि दान म्हणों ते काइं जीव जीवासि देति देवता जीवासि देति । म्हणे ना जीव देवता उपकारेंवीण कांही दीधलेंचि नाही । जीव तरि नवे हेतु दाटले होति । दीधलेयाची सत्ता सांडलीचि नाहीं । आर्जिलेयावांचौनि देवतेसि न देववे । जें दे ते कर्मलेपा आधार । म्हणौनि जीवदेवतांचें दान नव्हे । ईश्वरु देति 'ते दान । कां पा । जे लेपा आधार जरि देयावे तरि ईश्वरु निर्लेप । नाः हेतू जरी देयावे तरि ईश्वरु निर्विकारु । नाः जीवाचेनि उपकारें दाटलेंपणें जरी देयावेंतरी तरी तो निष्कामु । नाः दीधलेयाची जरि सत्ता करावी तरि तो उदास । म्हणौनि ईश्वरु देति तें दान बोलिजे ।"--म० वा० प्र०

"'दया"--"दीधलेया वांचौनि सुखचि नाहीं हा दयेचा गुण ईश्वरस्वरुपींचि आति । म्हणौनि देयावे देयावें ऐसें ईश्वरस्वरुपीं भरलेंचि असे । तेयासि देतां आपणपे सांभाळणेंचि नाहीं ।"--म० वा० प्र०

"मया"--"तरि मया म्हणजे काइं । नाः ममता ममत्व ईश्वरीं जीवाचें आति । वोखटें नासावें ते ममता बोलिजे । तरि जीवाचा ठाई ममता आति कीं । कां पा । जे गाईसि वासरुवांची ममताः वासरुवांसि गाईची ममताः गोवळासि गोरुवांची ममताः कुणबीयासि सेत सिवाराची ममताः बाइलेसि लेंकरुवांची ममताः लेंकरुवासि बाइलेची ममताः पुरुषासि स्त्रीयांची ममता स्त्रियेसी पुरुषा घरादाराची ममताः ऐसे जीए योनी जे उपनले तेयासि तेयाची ममता । म्हणे नाः हे अभिलाखपर ममता । तरि देवतांसि जीवाची ममता

असे की । कां पा । जे जेया झाडाखालीं देवता असे त्या झाडाची ममता । आन पालापाणी घाली तेयाची ममता । हे ममता कार्यीचि पुरती: फल भोगु जालेया मागौतां परतां लोटौनि घालीति । म्हणौनि जीवदेवतांचा ठाई ममता नाहीं । हे ईश्वरीचि आति । ”—म० वा० प्र०

“ कृपा ”––“ वोखटे फेडुनि गोमटे देति हे कृपेचे लक्षण । ” “ जैसा कव्हणी एकु वैद्य असे । तो एकाधेया एका रोगीयाते उपचार आदरी । तो तेय आपणचि जाए । मग आपणचि ओखद दे । आपणचि पथ्य सुए । बळी करुनि आंगीं पाणी सुए: मग लुगडे देउनि पाठवी । तैसें ईश्वर वोखटे फेडुनि गोमटें देति । ”––म० वा० प्र०

“ कारुण्य ”––“ गुणें झळबलेया कीएचा ठाइं उरी नाही । याते कारुण्य बोलिजे । आवघें नवरस: तेयामध्यें नववा रस कारुण्य । तें कारुण्य दुखीं दीसे: आर्तीं दीसे: वीयोगीं दीसे: विरहीं दीसे: तीए करुणेचे जें गळीत सत्व ते कारुण्य बोलिजे । एर गुण अंशीं अन्येत्र वर्तेति । पर हा गुण जीवाचा ठाइं न वर्ते । देवताचा ठाइं न वर्ते: हा ईश्वरस्वरुपींचि आति । कां पा: जें झळंबणें ते आणिके ठाइं न दीसे । म्हणौनि इये अर्थीं वैद्याची उपपत्ती दीसे । मेले राखे ऐसा वैद्य : तेयाचेया पुत्रासि ज्वरु उदैजे । मग तेयाचे हातपाये गळौनि पोटीं रीगति । मग आणिक वैद्यापुढे त्रसाचीया सेंदा घालीते म्हणे म्हणति । तुम्हीचि एकाधा रस पाहुनि देया हो । तो म्हणे: माझे हातपाये गळीनले असति: मा मी यीसि काई देईन । ऐसा करुणां झळंबे । ”––म० वा० प्र०

९ “नित्यत्व”––“अविनाशत्व ” “जीव देवता ईश्वरु नीत्य । जीवदेवतांचीं स्वरुपे नीत्यें परि तेयांचीं करणें विलक्षण । ईश्वरु आणिकांते नीत्या करि । नाशिवंता पुरुषातें नीत्य करी । ऐसा ईश्वरीचा धर्म नीत्य । तो अनुभवीय: स्वरुपाते साधणेचि नाही । जैसे काळें गोरें काइं आंगावेगळे करु येत असे । —म० वा० प्र०

“व्यापकत्व”–– “ ईश्वरु सकळांतेही व्यापुनि वर्ते । म्हणौनि व्यापकत्व बोलीजे । जीव एकदेशी: जिए देहीं घातले ते तेव्हडेचि होति । देवता एक-

एकीं व्यापिली। चैतन्य व्यापुनि ईश्वर–स्वरुप उरलेंचि असे। तेया अगाधा ईश्वरस्वरुपातें धर्मीं व्यापिलें। जीउ केलेया व्यापक होत असे। आन ईश्वरु व्यापकु होए।"

"सर्वात्मकत्व"–– "सर्वांचा आत्मा होउनि वर्तत असे म्हणौनि सर्वात्मकत्व बोलिजे। जैसें उदक सार्ववाही ( सर्वत्र वाहणारें ) जालें असे: वृक्षादिकांचा ठाइं जेया वृक्षाचा जैसा गुण तैसतैसे प्रस्रवलें असे। तैसें ईश्वरस्वरुप सकळाचा ठाइं भावलें असे। पान फळ न मोडत आंतु तैसाचि ईश्वरु असे। फळें उदकाची तरि होति परि उदकाआंत पडिलेया उदकासि न मिळती। तैसें ईश्वरस्वरुप सकळांतु भावलें असे। परि जीव देवता तिया वेगळियाचि।" —म० वा० प्र०

"सर्वातीतत्व"—"तरि सर्वात्मकत्व असौनि अतीत कैसे। नाः जीव स्वरुपाते अतिक्रमुनी· ईश्वर आपुलां स्वरुपीं वेगळा वर्तंतु असे। हा धर्म ( अतीत्व ) तेथही वेगळा।"––म० वा० प्र०

"सर्वकर्तृत्व"––"तरि सर्वार्थीं वेगळा जाला आन काइं। म्हणे नाः जो सर्वकरणीं वेगळाः तरि सर्वकरणी म्हणजे काइं। म्हणे नाः जीव देवता प्रपंच मळ कर्मे फळें कर्मभूमि। जीवीं कर्म करावेंः मग कर्म लागावें: देवतीं फळ संपादावेंः एका संबंधफळ देयावे। हे आवघे तेयाचेचि कर्तृत्व।" ––म० वा० प्र०

"सर्वसाक्षीत्व"––"तरि सर्वकरणीं कव्हणीं ठाईं असे। ना : तो सर्वांचा साक्ष होऔनि असे। आपण करीनाः आणिकां करवी करवीनाः करितां तरि सकळही देखेः याते साक्ष बोलीजे। ऐसीया सकळ क्रीडा करितां देखे। परि उदासपणें वेगळाचि। हे सकळही तेयाचीचि करणी।"––म० वा० प्र०

"एवमादिक"—"ऐसिया अनंत जड चेतन शक्तियुक्त परमेश्वर असे। युक्त म्हणजे एतत् सहीत। म्हणजे काइं। नाः अनंता चेतनाशक्ति अनंत

गुण अनंत धर्म ज्ञानविज्ञानः एहीं शक्तीसहीत परमेश्वर । जैसा रावो सर्व दळें साहित होत। तैसा परमेश्वरु सर्वशक्तिसहीत । ”

“ इतुले स्वरुपीचें युक्तत्व सांघीतले । तर ब्रह्मयुक्तत्व म्हणों आन काइं । म्हणे नाः तें सर्वधर्मशून्य । ब्रम्ह आस्ति आन नास्ति ऐसाही भावो नाहीं । तर माएयुक्तत्व म्हणों आन कांइ । म्हणे नाः तादात्म्यत्वे माया ईश्वरीं वोळगति असे । ते धर्मवंत गुणवंत विकारवंत म्हणौनि धर्मा वेगळी केधवांहि जालीचि नाहीं । युक्तत्व आणि वेगळा हे परमेश्वरींचि आति । ” “ ऐसा गुणधर्मयुक्त परमेश्वर तो आठवीजे चींतीजे ध्याइजे स्मरीजे । ”–म० वा० प्र०

## ७ निर्वचन

[ हें सातवे प्रकरण असून त्यांतील तीन सरवाळ्यांत २३ सूत्रे आहेत; पहिला सरवळा ३ सूत्रांचा असून त्यांत “अंशत्रयव्यापकत्व ” सांगितले आहे; दुसऱ्या सरवळ्यांतील १५ सूत्रांमध्यें “ संपूर्णत्रयव्यापकत्व ” आणि तिसऱ्या सरवळ्यांतील ५ सूत्रांमध्ये “ घनत्रयसहितकूटस्थ परमेश्वरलभ्यत्व ” दिलें आहे. निर्वचनांत ईश्वरस्वरुप वर्णिलें आहे.

‘महावाक्य’ प्रकरणांत ५ व्या सूत्रांत परमेश्वर हा ब्रम्ह-माया-ईश्वर अशा तीन अंशांनीं युक्त आहे हें सांगितलें;त्या अंशत्रयाचा वेगळेपणा स्पष्ट करण्यासाठीं ‘निर्वचन’ प्रकरण दिलेलें आहे. “ जैसे क्षीर आन नीर एकत्र मिळौनि असति । मग राजहंस असे तो चांचु हाणौनि नीर वेगळें करी । तैसा ठावो कीं । ”––नि० प्र०

१ “ ईश्वरु ”––“ नीएमीता म्हणौनि ईश्वरु । जैसा चक्रवर्ती नाएका मंडळीका रायातें नीएमूनि वर्ते तैसीया ईश्वरें देवता निएमिलीया असति । ”––नि० प्र०

२ “ आनंद ”—“ निरतिशये सुख । जेथ सुखाचा अतिशयौ निवर्तलाः एयातें आनंद वोलिजे । तर काइं तो यौगिकु असे । म्हणे नाः ते अवघें स्वरुपचि आनंदाचें । जीवदेवतांचीं सुखें यौगिकें । तैसें ईश्वरीचें नव्हे । तें

स्वरुपचि सुखाचें। जैसी साकरः तियेसि काइं आणिकाचा योग लागत असेः तैसा ईश्वरु आनंदरुप। कां पांः जे श्रीप्रभु ते आत्माराम म्हणितलें म्हणौनि। तो जीवातें देवताते आनंदवीत असे।" "जयाचा साधनवंत (भक्त) आनंदरूप तर परमेश्वर आनंदरूप हे काइं म्हणावें असे।"--नि० प्र०

"३ ब्रम्ह"--"ऐसा जरि सुखरूप तर एकदेशी आन काइः म्हणे नाः तो ब्रह्म कीं। ब्रह्म म्हणजे आवघेया पासौनि थोर। बृहत्तर वृधौ म्हणजे थोर। सर्वांतें व्यापौनि वर्ते म्हणौनि।" --नि० प्र०

४ "अच्युत"--"ऐसा जरि वडील तर तयाचेया मनोधर्मा च्युति असैल आन कांइ। म्हणे नाः तो अच्युत की। कव्हणे ठाइं वेचला नाहिं तो अच्युत।" "अवघीया (जीव देवता) स्वतंत्रा करुनि सुखिया केलीया। पर परस्परे अधीनत्व नाही। ऐसा (ईश्वरु) आपण सुखदानी तो आणिकांचें सुख काइं आपेक्षील। म्हणौनि तोचि अच्युत।" नि० प्र०

"विकारा वेचा भेदः यथा विंचवाची व्यथा व्यापार करितां विसरीजेना तो वेच। येर जैसा काटाहारळः लागे तेव्हेळींचि दुखवे। वेच पां नाहीं।" "देवता क्षेदाल्हादें जीव तव तो विकाररुपचि। आन विकार उपजे तया वेच होए अथवा विकारचि होवौनि निवर्तेः अथवा स्वतंत्र वेच उपजे। देवताविषइं अथवा ईश्वरी प्रेम तो स्वतंत्र वेच।"--भाष्य.

५ "अवक्रियु" —(अविक्रिय) "ऐसा अच्युत तर काइसेनि एकें विकरतु असे। आन काइ। म्हणे नाः तो अविक्रियु की। तर अविक्रियु म्हणजे काइ। ना काईसेनहि विकरेना म्हणौनि।" "मनें वाचा कर्तव्यपदार्थसंबंधें वीकरेना म्हणौनि।" "अन्तरबाह्य जेणे सांडीले तो अविक्रियु।" —नि० प्र०

६ "अव्यक्त"—"ऐसा अवक्रियु तर काइसेनि एकें (प्रमाणें) जाणीजे आन काइं। म्हणे नाः तो अव्यक्त कीं।" "अव्यक्त म्हणजे अप्रमेयु। प्रमाणीं न प्रकाशेः स्वयंप्रकाशी यथा सूर्य।" --भाष्य.

७ " अमूर्त "--" स्वरुपें मनोधर्में क्रीया मवला । एव्हढा आमुकेया सारीखा ऐसा म्हणोंचि नैए म्हणौनि अमूर्त । " --नि० प्र०

८ "सुद्ध"—" ऐसा जर अमूर्त तर अन्यथाज्ञानरूप मळस्वरुपीं असैल आन काइं । म्हणे नाः तो शुद्ध की । " " स्वरुपे मनोधर्में क्रियां ईश्वरुचि शुद्ध । तर स्वरुपें कैसा शुद्ध । नाः गोसावी खडेया खुपटेयाचिए दृष्टांतीचें उदक सांगीतले । तीए उदकी कांही मळ नाहीं । तैसे स्वरुपीं अन्यथाज्ञानरुप मळ नाहीं । म्हणौनि स्वरुपे शुद्ध । "

९ " बुद्ध "--" बुद्ध म्हणजे ज्ञानमय स्वरुप । "--भाष्य.

" बुध हा धातु ज्ञानीं वर्ते । म्हणौनि ते स्वरुपचि ज्ञानाचे । " " स्वरुप-निष्ट ज्ञान ब्रह्मांडीं आलेया खंडलें । ब्रम्हांडींचे ज्ञान विग्रहाची ठाई खंडलें । पिंडस्थेचा ठांई खंडले । तैसे ईश्वरीचे नव्हे । "--नि. प्र०

१० "नित्यमुक्त"--"नित्यमुक्त–म्हणजे काइं । म्हणे नाः अज्ञान अधीनत्व अविद्या ये तिन्ही नसौनि अनादीचे मुक्त । तें केविः नाः बुद्ध म्हणौनि अज्ञान नाहींः प्रभु म्हणौनि अधिनत्व नाहींः केवळ म्हणौनि अविद्या नाहीं । " --नि० प्र०

११ "निरभिमानु"–"अभिमानाचे दोनीं पक्ष । एक रजोरूपः एक तमो-रूप । रजोरुपाचे दोनीं पक्षः एक अहंताजनितः एक ममता जनित तर अहंता-जनित अभिमान तो कैसा । नाः संसरणीं मोटका माया चेतवी आन चैतन्यातें मी म्हणे । ममताजनित अभिमान तो बाह्यपदार्थीं । तो कैसा । नाः माझी स्त्री इत्यादि । ऐसा जीवासि सानीए क्रीएचीए ठाउनि थोरपर्यत ममताजनित अभीमान । "--नि० प्र०

१२ " पर "--" ऐसा जर निरभिमान तर साना आन काइं । म्हणे नाः तो पर कीं । तयापरते आणीक कांहींचि नाहीं म्हणौनि पर । "--नि० प्र०

१३ " परि साक्षित्व "--" साक्षी म्हणजे काइं । नाः उदासपणें देखतो । काईसयाचा पक्षपात-नाहीं।कां जे सर्वज्ञें म्हणितलें: ऐश्वर्यादि करुनि सकळै धर्म मायासंबंधेंचि तेथ । "--नि० प्र०

१४ " केवळ "--" दुसरे नाहीं ते केवळ । " " स्वरुपीं कवणीं धर्म नाहीं तो केवळ । "--नि० प्र०

१५ " नीत्यसंबधें "--" नीत्य म्हणजे तिही काळीं असतचि असे । संबंध म्हणजे योग । तो केधवांहि सुटलाचि नाहीं । जैसे देहीं रोमां असति आन आत्मेया वेगळें तेहासि असणेंचि नाहीं । रोमां तीया वेगळीयाचि । तैसे केवळा स्वरुपाचेनि योगें माया असे । पर एरी शक्ति तीया वेगळीयाचि असति "--नि० प्र०

" माया असे "--" तर माया असे म्हणजे काइं । म्हणे ना : स्वरुपें मनोधर्में क्रीयां अधीनत्वे रंक होउनि असे । तर मनोधर्में कैसी असे । नीरंतर प्रवृत्तीची वाट पाहे । क्रिया कैसी असे । ना तेथचियाचि प्रवृत्तीं सृष्टि रचिली: तेथचियाचि प्रवृत्तीं संहार केला. तेथचियाची प्रवृत्तीं अवतारीं पुर जाली । म्हणौनि केवळें ईश्वरस्वरुपीं नीरंतर माया असे । "--नि० प्र०

१६ " संबंधा पातली "-" पातली म्हणजे काइं । नाः जैसें रायाचीए आंगसेवे सेवक पातले तैसी माया समवाए पातली । ते कैसीः नाः मायामुख्य सकळ देवतांचेया स्वरुपांत ईश्वरस्वरुप भावलें असे । म्हणौनि ईश्वरस्वरुपाचेया कडुनि पातली । आन न पवे । "--नि० प्र०

" तेथचि न पवे "--" ते कैसीः नाः जे स्वरुपासि पातली तेथचे ज्ञान-सुखःसामर्थ्यःप्रकाशेः ऐश्वर्यें नेणे म्हणौनि तेथचि न पवे म्हणितली। जैसा दर्दुर कमळणीतें पातला पर तेथचे पराग नेणें । ते आणीक सेवीतिः तैसी माया स्वरुपी पावौनि न पवे । जैसा प्रधान रायाची सेवा शारीरें व्यापारे करी पर तेयासि रायाचेया सुखाचा अनुभव नाहीं । म्हणौनि केवळीं ईश्वरीं माया पावौनि न पवे ।" --नि० प्र०

१७ " वस्तु "-- " स्वरूपातें माया पावौनि न पवे ते कां पा । नाः वैजात्य म्हणितली : ईश्वरस्वरुपाचेया काइसेयासिही योग्य नव्हे म्हणौनि । " --नि० प्र०

१८ "ऐश्वर्यादि,करूनि "-" ऐश्वर्य म्हणजे काइ । ना : नीएमणें । तर काइ नीएमिले । नाः माया नीएमीली । ते कैसी । नीरंतर प्रवृत्ती वोळगतीचि असे । जैसी प्रतिव्रता पतीचेनि व्यापारें नीएमीली असे !"-नि० प्र०

" धर्मामध्यें ऐश्वर्य हा थोरः यथा माणुसा आधीं बळः मग येर व्यापार !" —भाष्य.

" सकळै धर्म "--" जेथ माया संबंधातें पातली असे तेथचि ईश्वर ( सकळही धर्म ) स्वीकरिति । ते काईसेनिः नाः कृपाळुपणें । तर मायेचेनि संबंधें केवळत्व भंगलें कीं । म्हणे नाः तीएसि विरुधः म्हणौनि न भंगे । ते कैंविः नाः केवळीचि नित्यसंबंधें माया असे । तेथचि माया पातली असें । पर तेथ न पवे म्हणौनि । "--नि० प्र०

१९ " सर्वात्मकु"--" ईश्वर सर्वांचा आत्मा कैसा । नाः उदक एकचि पर सर्वांचां ठाइं जालें असे । तैसें ईश्वरस्वरुप सर्वांचां आत्मा जाले असे । आन ईश्वरस्वरुपाचेनि आत्मत्वे जीवदेवतांचा ठाइं चेतनत्व दीसते असे । आपण आत्मत्वें जीवन होउनि आणिकांसि जीवीले । आपुलेनि चेतनत्वे आणीकासि चेतन करीतो म्हणौनि ईश्वरस्वरुप सर्वात्मक । "—नि० प्र०

" सर्वातित "—" अवघेयांत असौनि वेगळेपणें अवघेयातें अतीक्रमुनि वर्तत असे म्हणौनि अतीत । " " सकळांत असौनि पर स्वरुपें लिंपे सिंपे ना आन धर्मेंहि लिंपे सिंपे ना । " नि० प्र०

२० " सर्वकर्ता "--" ईश्वरस्वरुपचि कर्तें तें कैसें । नाः ईश्वरे कृपाळुपणें जीव उधरावेया सृष्टि रचिली पर अवतरलेया वांचौनि उधरण नव्हे

म्हणौनि सृष्टी आंत अनंतीं ब्रह्मांडी अवतरौनि एकेकें ब्रह्मांडी अनंत अवतार देवांमध्यें तीर्यैचांमध्यें नरांमध्यें भोगभूमी कर्मभूमी अवतरौनि अवरद्दश्ये परद्दश्ये उभएद्दश्ये होवौनि जोवाते उधरीति म्हणौनि स्वरुप कर्ते। "--नि० प्र०

## ८ उद्धरण.

[ या प्रकरणांत आठ सरवळे आणि ६६ सूत्रें आहेत. पहिल्या सरवळ्यांत ११ सूत्रांमध्ये " अवतार निर्धार " केला आहे. दुसऱ्या ९ सूत्रांमध्ये " संबंध –निर्धार " केला आहे. तिसऱ्यांतील ८ सूत्रांत " अस्तित्व–निर्धार, " चवथ्याच्या १३ सूत्रांत " सत्ताज्ञान–निर्धार, " पांचव्यांतील ५ सूत्रांत "सामान्यज्ञान–निर्धार, " सहाव्यांतील ६ सूत्रांत " विशेषज्ञान–निर्धार " सातव्यांतील ५ सूत्रांत " अविद्याच्छेद–निर्धार " ,आणि आठव्यांतील ९ सूत्रांत " साध्य–निर्धार " देऊन हा परिच्छेद पुरा केला आहे. ]

१ सृष्टीमध्यें—"कर्मभूमीमध्यें; साधन निष्पत्ती कर्मभूमी वांचौनि नाहीं म्हणौनि । सृष्टीमध्यें कर्मभूमी केवीं पा। जे आवघेया ब्रम्हांड गोलकाचेंया अवकासाचां मध्यें: देवताचेया स्वरुपाचा मध्यें: देवमनुष्यत्रीयंचतोमध्ये आन कर्मभूमी वांचौनि सकळ देवता नाही। ईश्वरी नाहीं आन पिंडी नाही: विद्येचें संपूर्णत्व नाही म्हणौनि। " भाष्य.

अवतरति—" सृष्ट संहाराचा उल्लेख प्रंचाबाहेरिला। स्वरुपा--रामीप अवतार तो देहा बाहेरिला। स्वरुपाचा धर्म अव्यक्तौनि ( अव्यक्तापासून ) स्वीकृत। "—भाष्य.

" कृपारूप धर्म ईश्वरींचि वर्तति । स्वरुपी लोपती। खेद आल्हाद हे धर्म देवताचे स्वीकारिती। ते जवं मूर्ती तव आसती: मग जाति। जीवाचेनि भजनें आल्हाद उपजे: आल्हादें कृपा उपजे।"—भाष्य.

२ मनुष्येवेषधार्ये:--मनुष्येवेष म्हणजे तयाचे गुणधर्म अंगीकरी। तेचि हरुष विषाद विसर देहद्वंद मनोद्वंद तोख आन खंत। तर खंत कां: तेणेंवीण जीव इष्टीं योजिती ना।

"वेष म्हणजे लटिका: स्वरुपाचें ज्ञान असौनि रुपांतरातें धरी तो वेख:यथा बहुरुपी।"

" लटिका होवौनि पर ईश्वरीचेनि अंगिकारें जीवासि साच। तयाचेनि भजनें सेवादास्य गोमटें होत असे।"

होति--" जैसा जीव देहांत व्यापला असे तेतुला ठाइं आपण होत। दुसरे मनुष्यवेख तो ऐसीयाते म्हणिजे: वय रुप गुण उपगुण कुशळता चातुर्ये जाणीव सिहाणी व बळ प्राक्रम ( पराक्रम ) बहिर्यांगाचा अंगिकार एतुले वर्ते।"-भाष्य.

३ मायावेष—मायावेष म्हणजे मायेचिए अंगियेचे: मायेचे गुणधर्म अंगीकरिती। मायेचा धर्मीं सकळ फळे साधन देणे: सकळ साधन निष्पत्ती करणें: साधनवंताचा अभिमान घेणें आन तिन्ही दानें देणें।" "मायेचे गुणधर्म सांगितलेया सकळ देवताचे सांगितलें होति। यथा चिंतामणीमध्यें सकळ द्रव्य।"-भाष्य

४ मायापुर--" अवघे पुर तें: तेथ कांहीं उणें नाही। देहधर्म: जीवधर्म: मनुष्याचे धर्म: देवताचे धर्म: माएचे धर्म: परावर शक्तीचा अंगीकार: स्वरुपीचे गुण: जडा चेतना शक्ती: चारीं दानें यांतें बोलिजे।" भाष्य. " सृष्टीचीया जीवोद्धरणीं परिपूर्ण जालें म्हणौनि पुर।"

५ मायानिर्मित--"मायानिर्मित म्हणजे माया निर्मिलें। तर मायानिर्मित कृतयुगीची मनुष्यें तैसें म्हणों। ना: तियें ( मनुष्यें ) प्रपंचाची ( माया ) निर्मी। तैसें हें नव्हें।"-भाष्य.

६ घटाकारें आकारे वोते--"घट म्हणजे देह। घडिला म्हणौनि घट। आकारे म्हणजे ते आपणची होए। प्रपंचवत वोते म्हणजे तया घटामाजी स्वरुपे। तेथ चेतनत्त्व असेः ज्ञान नाही। यथा वोतकर्मी आधीं प्रतिमा आकारी मग रस वोती। तैसे देहाचा आकार आकारी मनोधर्मैः मग वोते स्वरुपें। तैसेंचि स्वरुप वोते ईश्वरीचेः मग तेथ विश्रांत होए ते अज्ञान। जे भजनातें अंगिकरीती असे तृप्ति पावत असे। येथ तीन अर्थः घट आकारली ते जडः वोतिली ते अजडः आन विश्रांत ते चिज्जडः।" भाष्य.

"निरवएव ब्रम्ह होते तेचि सावएव साकार जाले। तर तेचि कव्हणे न्याये साकार जालें तें बुझावेया वोतकर्मियाचा दृष्टांत दीधला तर तोचि कैसा। नाः माया घटाकारें आकारे वोते म्हणितलें। एणें वाक्ये अवर पर उभये तथा देवमनुष्य तीर्यचे सकळ अवतार जाणावे। तर तेचि कैसें पा। ना। जैसें तो वोतकर्मी आधीं प्रतिमेसी आकारीं मग तियेमध्यें रस वोती तया रसाची मूर्ती मुसेसारिखेची आकारे। पर तया रसासि कव्हणीचि आकार नसे। तैसी मूस ती त्रीविधें कर्म-फळेंः तिएचीं गर्भ दवडणेंः पतित तेंचि घटः तयाचेनि आकारे माया–स्वरुपे आकारी। एथा कोळसेयाचेनि आकारें अग्नि आकारला दिसे। वांचौनि तयासि कव्हणीच आकार नसे। तैसाचि माया-स्वरुपासिही कव्हणीचि आकार नसे।"--पू. प.

७ आदिकरून शुद्ध चैतन्येचि ते—" नखचर्मरोमादिकरून म्हणजे ये तिन्हीं ठाइं जड। पर ते मुख्य करुनि सप्तधातू आपाद-मस्तक आवघी मूर्त कवळली। शुद्ध म्हणजे फळीं व्यापारीं जीवीं मैळणें नाही। चैतन्येचि ते म्हणतलिया प्रपंच नव्हेः अवघी मूर्ती चैतन्याचीचि।" " आकार तोचिः तया पालट

नाहीं। कर्मवशे जे फळ रचिले होते तेचि अंगीकरीति। ते पुर त्यजिलिया मागुते पुर्वीलाचि सारिखे: ऐशी मूर्ती चैतन्याची।"–भाष्य.

"एवं प्रपंचाचेया घटाचेनि आकारें माया आपण आकार। मग तयामध्यें रस वोते। मा तया रसासि कव्हणीचि आकार नाही। मग जैसी तया वोतकर्मीयाची मूर्ती मुसेसारिखी आकारे तैसीचि तया कार्मिका घटासारिखीचि मायामूर्ती पुरस्थ होए। मग तोचि घट तयाहीमध्ये परमेश्वरस्वरुपे वोते। ना जैसा रसासीं कव्हणीचि आकार नाही तैसाचि वोतलीया परमेश्वर–स्वरुपासि आकार नाहीं। पर तया घटाचेनि आकारे आकारवंत श्रीमूर्त दीसे। याचिपरी देव-मनुष्यतीर्यंचाचे जैसजैसा घट तैसतैसा पुरस्ते माएचा आकार होए। मग तयांत वोते जे परमेश्वरस्वरुप तेंही तया घटासारीखें आकारवंत दीसे। पर वोतले जे अव्यक्तस्वरुप तयासी कव्हणीचि त्रिलिंगाकार नाही ऐसे जाणावे।" —पू॰ प॰

८ अभिमान—"अभिमान म्हणजे क्षेम क्षेद दुःख आल्हाद।"-भाष्य.

९ संपूर्णा—"तरी संपूर्णा शक्ती म्हणीयेति काइं। ज्ञाने ऐश्वर्ये सामर्थ्ये सुखें प्रकाशे। एणें सकळेसी संपूर्णा होउनि मूर्तीतें ओळगती असती।" म. वा. प्र.

१२ ऐसिया मायापुराते—मागें उ॰ ४ टीप पहा: "जे पाइका न लाहे ऐसें होते। तया एसणें सामर्थ्य आलें। जे चाऱ्ही दाने दे सकळ देवता ओळगतीः सृष्टीचीया जीवाते उद्धरीः ऐसें परिपूर्ण झालें। म्हणोनि "पूर" शब्द।"—भाष्य

१२ कर्मभूमिस्तीता मनुष्येदेहयुक्ता--" स्थिता म्हणजे तेथ ( कर्म-भूमी ) राहिले असति तया। तर भलते जीव म्हणो। नाः जे मनुष्यदेहे पातले तया। तर जेतुले मनुष्यदेहे पातले तया म्हणो। नाः जे युक्त तयासी। आवघेया अंगीं पुरतें: सर्वा-वयेवीं संपूर्ण चातुष्टययुक्त हें काइं म्हणावे असे। ते मनुष्य। एणें करून वेडे पिसे निराकरिले। "-भाष्य.

जीवा--" जीवासचिः संलग्नाते ना। "

ज्ञानपर्यंत--" कृपासाह्य गिवसणें: अधिकार घडविणे: ज्ञान देणे: एतुलें ज्ञानपर्यंत करीति। मग तयाचा कड पहाति। " " ज्ञान देति कारणें ईश्वरीची चौदा आन जीवाचे सात अधिकार। ऐसे एकवीस वर्तती तैची देति। तियेचि कवणें। सृष्टीमध्ये: कर्मभूमीः मायापुरः मनुष्यावतारः देहेधर्मः जीवधर्मः मायेचे धर्मः देवताचे धर्मः गुणधर्मः विज्ञानः अवरशक्तीः परशक्तीः ज्ञानः प्रवृत्ति ऐसे ईश्वरीचे चौदा। तर जीवाचे सात अधिकार ते कवण। नाः कर्मभूमीः मनुष्यत्वः युक्तत्वः कर्माधिकारः देहाधिकारः मूळाधिकारः ज्ञानाधिकार। आन अनधिकार न व्हावे ते व्हेळी जीवास ज्ञान देति। "-भाष्य

कर्मभूमी कां सांघीतलीः आणिके ठाइं कर्म न निफजे हाचि विशेष। मनुष्यत्व कां सांगीतलेः ज्ञानालागीं। पिंडस्था कां सांगितलियाः विद्येलागीं। " " एकासी मनुष्यदेहे आपण देतीः एकास अधिकार घडवीति। आभारलेपणे भजन स्वीकरीतिः भोग भूमीचे कर्मभूमी आणीति। गोसावी जे देह दीधले तेथ पापाचा लेप न लगे: पुण्याचा लागे। सुख-दुःख भोगीं तेथ पापाचा अंश अनेकी जन्मीचा नाशेः पुण्याचा राशी वाढे। "-भाष्य.

१३ एका--" पुरभजनाचेया। ज्ञानियाची ऐसीच ( व्यवस्था )। पर ते आनचि जात "।

प्रेमि--" वियोगीं नुरे ते प्रेम । "—भाष्य

संचरीति--" प्रेमाचा संचार तो दृष्टीद्वारेचि। लोकींचें प्रेम ते दृष्टीच की । " भाष्य

१४ प्रेम बोलीजे भक्त बोलीजे-- " प्रेम तेचि भक्त । प्रेमाची उत्तर अवस्था ते भक्ती । यथा बोधाची उत्तर अवस्था ज्ञान । नुसद्धेनि बोधे बोधवंत तोचि शास्त्रें दृढावलेया ज्ञानिया । म्हणजे कोमळ तो बोधवंतः जरठ तो ज्ञानिया । तैसें कोमळ तो प्रेमीया जरठ तो भक्त । प्रीतीची उत्तर अवस्था प्रेमः प्रेमाची उत्तर अवस्था भक्ती । "–भाष्य.

१५ उछेदुनि जाति--" प्रेमाचा संचारीं मनोद्वंद्व नाही । विकार उच्छेदला म्हणौनि । विकारें मनोद्वंद्वे. विकल्पे अन्यथा ज्ञानः आन स्वभावें देहेद्वंद्वे तीही करुनि तिन्ही जाति । संचरत संचरत उच्छेद । मात्रशब्द अल्पकाळा वाचक । प्रेमे स्वभावः ज्ञाने विकल्पः आन वैराग्ये विकार उच्छेदुनि । स्वभाव दिसत असे तर उच्छेद कां म्हणितलाः कार्य नाहीं म्हणौनि ।" --भाष्य.

१६ संनिधानि—" सम्यक् प्रकारे निधान मूर्तीची नित्यजवळीक म्हणौनि संनिधान ।"

१७ भक्तासि--" भक्त म्हणितलया ज्ञानिये निराकरिला । "

साध्यसाधन प्रतिती--" साध्य म्हणजे स्वरुप । साधन म्हणजे साध्यातें देतें जें । "--भाष्य.

प्राप्यप्रापक बोध--" प्राप्य म्हणजे जें पाविजे तें । प्रापक म्हणजे तयातें पावविता । बोध म्हणजे हे दोनी ठाइं श्रीमूर्तीचे होए ऐसा निश्चयो पातला । "

"तर प्राप्या साध्या कैसा भेद॰। स्वरुपातें पावणें तें साध्यः आन तेथ पावौनि तेथिचा अनुभव लाहिजे ते प्राप्ये ।"

"प्रतीती बोधा कैसा भेद। ज्ञानासवे हा ईश्वर ऐसें प्रत्यया आले ते प्रतीति। तेंचि शास्त्रीं दृढावें। जीवीं निश्चयो पावेः बैसोनि ठाके तो बोध एकी पूर्वावस्थाः एकी उत्तरावस्था।"
—भाष्य.

१८ साध्य—"जें साध्ये तेचि साधनरुप व्यक्त जालेः तयासीचि हस्त-पादादिक निघाले। सावएव ब्रम्ह हे ऐसी प्रतीति मूर्तीवरि भक्तासी।"—भाष्य.

२१ परा—"परावाणी."

गीरा—"वैखरीवाणी."

आस्तित्व साधिति—"दोही करौनि (परा+वैखरी) आपुले म्हणजे स्वरुपीचे अस्तित्व शब्देचि ज्ञान करीति। साधीति म्हणजे परमेश्वर एक सृष्टीमध्ये बोलीजे तो मूर्तीयांत सिद्ध केला।"
—भाष्य.

२२ एक अनुसरति—"एक अनुसरति एक ननुसरतिः हें जीवाचें स्वातंत्र्य सांघीतले। जेतुकेयां ज्ञान तितुकें आनुसरति ऐसें नाहीं।" "परमेश्वर आपुला कड करोतिः वरचील कड जीवाचा।"—भाष्य.

२३ प्रभादीए—"पतित अनर्थीये। परमेश्वर दुऱ्हावें या परतें पतन अनर्थचि नाही।"—भाष्य

सृष्टशुन्य—"तया सृष्ट निर्फळ वांझासी जाये। ईश्वरेसीं सोएरिकेचा सांधा तुटे।" "ईश्वरीची कणव होएः माउली पण होय पर उद्धरण हेतूचा सांधा तो नाहीं। यातें शून्य बीलीजे।"
—भाष्य.

२४ आगांतुक कुंठे--" कर्मांचिये व्यवस्थे आधीं आगांतुके कां। जें झरा आधी बुजावा मग उरले पाणी सोडावें। येसणे ज्ञान संनिधान अनुसरण दास्य येणे थोर निफजेल म्हणौनि अर्धी-कार मोडीला। ( जीवाचा कर्तृत्वाभिमान सांडला ) तेणे अनारब्धा पाकहो पारुखला। जैसे धान्य उगवतां पाऊस न पडेचिः तेणे बी उगवेचिना। एक उकाणियां (उकलते कणीस) पोटरियां आले ते सुकलेः पक्व ते भोग्य।"–भाष्य.

२८ कैवल्य--" कैवल्य ज्हणजे ईश्वरीची प्राप्ति।"

मोक्ष--" संसारनिवृत्ती आन ब्रह्मस्वरूपीं आसणे "

२९ अनुसरुनि--" अंतरी अधीनता बाह्ये सेवादास्य ते अनुसरण।" —भाष्य.

संनिधान--" ज्ञानः अनुसरणः संगः जवळीकः सेवाः दास्येः भजनः निरुपण येतुलियांते संनिधान पातला बोलिजे।"

तयासि--" जो शाब्दे निवळिलाः एरासी नाही।"

३० अवसरी--" पूजावसरी।" " थोर योग्यता जोडावया साधन चरित करावया सामान्य ज्ञान विशेषज्ञान तेही पूजावसरीच देति।" —भाष्य.

मळांचे परिसारण—" सकळ मळ म्हणजे यक्षिणीचे टावौनि गिश्र-वेन्ही। परिसारण म्हणजे परते सारीति दृष्टि करौनिः यथा बाबुळी।" " आद्य मळ तो जीवेसी युक्त असे तथा अवि-द्याही। दोन्ही ( अद्यमळ व अविद्या ) कृपेचिया आणियां भेदीति।"--भाष्य

मळ घालीति—" दृष्टीं हालवीति आज ( मागुते पूर्ववत ते मळ ) मिळती।"--भाष्य

३१ सत्ता--" म्हणजे अस्तित्व दर्शन।"

शुचा बोलीजे--" जीवास प्राप्तीची प्रतीति स्फुरते. अस्तित्व दर्शन हे सूर्याच्या दर्शनाप्रमाणें जाणावें; पूर्वीचें ज्ञान दिव्याप्रमाणें मंद फिकट होते; कारण तें केवळ शाब्द म्हणजे ऐकीव होतें; पण हे ज्ञान झाले.

अवीभचार्य--" साधनें काइसेंनि न वचे तें अव्यभिचार्य " अभंग " --भाष्य

संस्कृत छाया--" कदाचिदवशेषमलानपसार्य शक्तिं च संचार्य भूयो मलान्यथापूर्वं करोति । सत्ता सूचनमव्याभिचारिज्ञानं चेत्यनर्थान्तरम् ।

३२ वीदिति—" आम्हां समुद्राची सत्ता जाली पर पैल सेवट अनुमानेना । ऐसे आपजैल । ते विदीत ( अभिज्ञात ) म्हणौनि निराकरिले । मग समग्राचें दर्शन आपजले । " भाष्य.

३४ अशेष कर्म जाणें—" अशेष कर्म म्हणजे समग्रेंही अनंता सृष्टीची विचित्रे जाणणें: हे अनुभवा वाचक । 'अनुभव तो प्रत्यक्ष देखिल्याचि । तर देखेचि म्हणावे कीं । नामा लेप नाहीं ऐसें एके असत: तेथ काइं देखावें । ज्या असे तियें देखे: दोन्ही साधावया जाणणें हेंचि उचित ।"–भाष्य

विघ्न–" म्हणजे विशेष हाणत हाणत म्हणजे साधनाचा विधात करीत । "

३७ विकारसृष्टी—" म्हणजे प्रतिकुळा: कांजे विकरून पुरुषा विघ्न करीति । "

कर्मसृष्टी—" म्हणजे अनुकुळा: कांजे पुरुषासि विधीचा क्रम करवीति । "

अधीना होति—" अधीन म्हणजें अनुसंगिका होतिः याचे समर्थपण देखौनि रंका होति । " " ईश्वरें कणवेतर अनुकुळा सबळा केलीया । कांजे कोमळज्ञानी पुरुष निर्बळ आन दोषाचे उलंघन बहुत । " —भाष्य.

दैव--" म्हणजे ब्रह्मादिकांवरुते चैतन्यपर्यंत देवता निघ्नरूपा होति ।" --भाष्य.

३८ पदा नेवो येती--" पद म्हणजे फळावाचक स्थानावाचक । नेवो येति म्हणजे रंकपणें आदरेसि । "-भाष्य.

वास न पाहे--" म्हणजे एउलीही इच्छा न धरीं । "-भाष्य.

३९ आलवीति डंडळवीति--" हालवीति म्हणजे अहंकार शब्दी ढाळीति । डंडळवीति म्हणजे बलात्कारे ओढोनि नेवोपाति ।"

जैसा कांहीं तैसाचि—" तयाचियातव ( तो ) कांहीचि न हले ! ढळेना चळेना । मग ते उबगोनि जाति । "-भाष्य.

४० संस्कृत छाया—"ब्रह्मतुल्यमप्यानन्दं ( शांभवं ) विघ्नत्वेन मन्यते ।

४१ विद्या—विद्या=परमेश्वर; अविद्या=देवता; पुरुष=साधनवंत जीव यांना ब्रह्मविद्या प्रकाशित करिते.

४२ सामान्यज्ञान--" सामान्य म्हणजे सत्तेशी थोरः विशेषा ( ज्ञाना ) न्यून्य म्हणौनि सामान्य । ज्ञान म्हणितलेया स्वसत्ता निवृत्ती करौनि येथही मळ सारावे लागति । अविद्या आद्यमळ भेदावा न लगे । कां जे मागील ज्ञाने केले ते संचरते द्वार विशेष पर्यंत असेचि ।-भाष्य

४३ वेगळा--"विकारसृष्टी आणि कर्मसृष्टी यांहून वेगळा." " मागा दोनी सृष्ट आधीना जालीया त्या थोरपणें कांहीं करूं न सकति । द्वंद ( विरुद्धभाव ) पारुखलें: पर मनीचे ( धाक, भय ) न फीटे ते येथ ( सामान्य ज्ञान झाल्यानंतर ) आत्यंतिक आस सांडीति । "--भाष्य.

आधीन--" दैवाधीना म्हणजे ब्रह्मादिका वरतिया ( देवता ) विघ्नरुपा होतीया। तिया येथ अनुसंगिका होति । मायेचे मनीचा रोख न वचे: विघ्न न करवे एतुलेचि तियेचें अधीनत्व ।"—भाष्य.

४४ अशेष क्षाळण—“ जेतुलींही कर्मे जेतुलेही मळ तेतुलेही नाशी । अपरोक्षीं कर्मः नासणेया क्षाळणेया भेद तो तरः नेणे ऐसा होए तो नासः माखले देखौनि करी चोखट होत देखे तें क्षाळण । क्षाळण विद्येवीण नाहीं । ”—भाष्य.

४५ तेणे लावीले—“ विश्वमळ परपरा यक्षिणीपर्यंत ‘मळ तेणे लावीले। काः जीवकृत प्रपंच यातव । मग मनुष्यदेहीं केलीं कर्मे ते लेप लावीले । ते तो ( जीव ) फेडी म्हणजे क्षाळण करी । ” —भाष्य.

नाही लावीले—“ आद्य मळ तो ईश्वर प्रउतीं माए लावीलाः तो तयाचेनि (जीवाचेनि) न फिटे । तो परमेश्वर नासीति अविद्योचिये पांति । ”—भाष्य.

४६ कर्मशब्दे मळ बोलीजे—“ मळातेही कर्म म्हणिजेः कां जे तेही केलेंचि की । एक ( कर्म ) शारीरमानसीकः एक ( मळ ) नुसुद्धे मानसीकचि । एका सुखदुःख भोग एका नाहीं । पर कर्म न चुके । दोहीं बंधनरूपेः दोहीतव ( जीव ) मैळे ।

४७ विशेष ज्ञान—“ विशेष म्हणजे यापरते नाहीं । अवघिया ज्ञानाचा विशेष । जीव-देवता–परमेश्वर तिन्हीं स्वरुपे सविशेष देखे । अपरोक्षी ज्ञावळे देखीत होता. ते सामान्यीं नावेक व्यक्त देखे । विशेषीं सविशेष देखिले । केवीं: दुरादर्शियाचेनि दृष्टांतें। “ मग सत्ताज्ञानी व्यवधान असे म्हणौनि सत्ताचि देखे । नावेक व्यवधान फीटे । मग सामान्य देति । मग सकळही व्यवधान फीटे म्हणौनि विशेष देति ।” “कव्हणी एक वाटां जात असे । तो दुरौनि वृक्ष देखे । पर आमुके जातीचा वृक्ष ऐसें नेणें । नावेक साउमा जाएः मग म्हणे हा आमुके जातीचा वृक्ष । पर तयाचे अशेष विशेष न देखे तया त्याची वृक्षातळी एक पुरुष एक आश्व एक बैल दुरौनि

देखे । तिहींचा आकार भेद जाणे: पर तयांचि आमुकी जात ऐसें नेणे। नावेक साउमा जाए: मग तिहींची आमुकी जात ऐसा भेद जाणें।

पर तयाचे अशेष विशेष नेणें । मग जाओनि तेया वृक्षा तळींचि उभा ठाके । मग तेया पुरुषाचे बैलाचे आश्वाचे वृक्षाचे अशेष विशेष देखे । ”

“ तैसे अपरोक्ष ज्ञानिया चहुं पदार्थांचिया स्वरुपाचा पृथक पृथक आकार भेद देखे पर तेणे झावळेपण न फिटे ।”

८९ कोपौनि उदासीन--“ •यथा माता पुत्राते अनेगेपरी शिकविताहि पुत्र शब्द न करी तेव्हेळीं तयासी भलतें होवो म्हणौनि उदास होए । तैसें माया ( मायेने ) विघ्न करौनि पाहिले पर तियेचा मोहरा ( सन्मुख ) न होएचि । ते व्हेळी तिये आस सांडिली: याते उदास बोलीजे । ”--दृष्टांत.

९० वेतीरिक्त--“ या ( माया+कृपा ) दोन्ही वेगलिया करुन । कां: जे दीधलीया दूसरा ईश्वर होईल । ”--भाष्य.

९१ प्रमाणद्रव्य—“ यथा रावो पुत्रा राज्य ·दे । मा ( मग ) परिवार जेणें भावे रायाते देखित होता तेणेचि तयातेही देखे । जैसा तो तैसाचि हा: पर तोचि न म्हणति । ”—भाष्य

९२ चरमदेहस्थित—“ एकीकडेचे म्हणजे विश्वेचे देह सेवट करणाचे जाणावे । चरमदेहे तेच मनुष्यदेहे । ”—भाष्य.

९३ कृपाकरीति—“ आव्हेरोनि उदासीना होति ते जावोनि कणव उपजे । अंगीकार करीति । अनुकुल होतिः प्राप्ती करावी ऐसी बुध उपजे । ”—भाष्य.

९४ मूळाअविद्या—“ सकळा ओखटिया गोमटिया मूळ । इयेचें कार्य जीवीत्व सुखदुःख ग्राहकत्व । ”

अज्ञान छेदे--" अज्ञान कारण येर कार्य । आत्यंतिक नेणीव तें अज्ञानः मग आनाते आन म्हणे तें अन्यथाज्ञान । हें अज्ञानाचे कार्य तयापासौनि उपजे म्हणौनि । " " त्रुट म्हणजे उपाय करावा न लगेः आपसयाचि कारणाचा नासीं नास (कार्याचा) ते त्रुटी । "—भाष्य

जीवत्व—" जीवत्व म्हणजे यथा कृपें विषयो होणे । अहंभाव उपजे ऐसी अधिकार-भूमः आत्मलुब्ध तो अंकुरः तो अवि-द्येवांचौनि उपजेचिना । "

" स्वरुपीचे ( अज्ञान ) ते अध्यासा कारणः अविद्या ते मळासी कारणः अच्युताचे ( अज्ञानी जे जन्मले वृथाज्ञान ) ते चतुर्विद्या ( फळासि ) कारणः आपुलें ते अन्यथा ज्ञानासि कारण । " "उच्छेद तो प्रेमेंः भक्ती नव्हे । " भाष्य.

५५ उतरंड—" बुडील आधार मोडलिया वरील रचना मोडे । अविद्येवरि चौची रचनाः अज्ञानः अन्यथाज्ञानः आद्यमळ जीवत्व । " —भाष्य.

५७ मायापारांगत--" तियेच्या स्वरुपांत असौनि वेगळा । यथा दुधांत चणे उदक घेतः पर स्नेह नेघति । तैसा तेथ स्वरुपें वेगळा जीव असे पर तो मायेसी नातळे । "

५८ साधननीवर्ते—" सृष्टांतरींची मुख्यें चहूं ज्ञानांत जे जोडली योग्यता आन ते जेणें साधनें जोडिली ते ज्ञान शक्तीही स्वरुपातें पातलेया परमेश्वर फेडिती । " भाष्य.

" यापरी योग्ये करौनि प्राप्ती करीति । मग परमेश्वर योग्यता फेडुनि प्राप्तीसी योग्ये करीति । प्राप्ती योग्य करणें या परतें करणें नाहीं । " " वस्त्र असेंः ते प्रथम सांदनी आंत पुरीजेः धुवीजेः ओपवीजेः तेल खार दीजेः तपवीजे । मग तांतु फुटे । मग पिळौनि वाळवीजे । मग डोळेयाचा मळ

लागे ऐसे होए । मग जे बीब दीजे ते ठाके । तैसे विशेषज्ञानीं अनादि अविद्या फिटलेयावरि प्राप्ती योग्य होए । पर जव साधन शक्ती न निवर्ते तव साध्यानंद न प्रकटे । जेणे साधन निवर्ते ते स्मरण करी: मग साध्यानंद प्रकटे । ऐसे नाम प्राप्तीते करी । "—दृष्टान्त.

९ अनुभूति—" जे सुख आपण अनुभविती तेचि तया देति । "—भाष्य.

० सामोरे—" म्हणजे अभिमुख: यथा माता । स्तनपान: दृष्टी: मनोधर्म: आन हाते स्पर्शणे । आपणपे म्हणजे समग्र स्वरुप अवंचकत्वे आंगे जीवे । परमेश्वरे दीधले मा ते दीधलेचि: कांहीं न वंचिती । जीवासि रमण देताति तर काइं परमेश्वरही रमत । म्हणे ना: तो स्वस्वरुपी रमे । "

१ ब्रह्मीभूत—" भूत म्हणजे मर्दने मिसळणें यथा तेलातुपा ऐक्यता । ते एकदेशी । " भाष्य.

२ पाठीसी—" आत्यंतिक दु:खापासौनि रक्षिला । यथा शरणागत । " —भाष्य.

३ मोक्ष—" बंधत्रुटी आन ब्रह्मस्वरुपी मिसळणे देति । म्हणजे नित्यत्वे संसारापासौनि सोडवीला । सदासर्वदा मोकळा केला: च्युति नसे । "—भाष्य.

४ बुडी दे—" बुडणे म्हणजे हरपणें अगाधत्वे । यथा तळ्यामध्ये तेलाचा थेंब घातला: तो हारपौनि गेला उदकाचेनि बाहुल्ये । "

५ विकल्प—" तो अनुभव कैसा हे जीव सहसा बुझेना: म्हणौनि ऐसे किंवा ऐसे ऐशा कल्पना न करावीया । "—भाष्य.

६ यापरी—" जरी परमेश्वर तरी क्रमेंचि । दुसरे. उर्ध्वमती जालिया येसणे गोमटे देति । "—भाष्य.

" तैसे परमेश्वर एका शब्दाचिया ठाउनि प्राप्तीपर्यंत योग्ये करीति। जीवासि बोधदातृत्व देवोनि चारीं ज्ञाने निर्वाळुनि ईश्वर. स्वरुपीं प्राप्तीसी मेळरिती। "

" गांवा खातीये ( लोहार ) औघे मिळौनि कामठा (कर्मस्थान कारखाना) घालीति। औघे गावींचे लोक खांडी (खडू ) सुऱ्या निसवीति। एकाधी एकाची सुरी सांदीसवडी पडली असे। ते तो घेऔनि ये: म्हणे ही सुरी लाऔनि द्या। तो हातीं घे: ऐसी पाहे: मग मनीं म्हणे ही सुरी रायासी योग्य। मग तो म्हणे हे औघे खते खादले असे। आगी आंत घातले तर जळौनि जाईल। याचे चार दाम घ्या मा (मग) मी याचा विळाखिळा करीन। तो दाम चार घे मा घेऊन जाए। मग तो ताट वेगळें करी: परज ( मूठ ) वेगळे करी। ताट ताटांत घाली परज परजांत घाली। तो विळवर म्हणिये ( काम ) करी पर दृष्टी तयावरिचि असे। मग ताट आगीते घाली: तेणे करुनि एक खत झाडी। तावी पिटी उजरी: तेणेंकरुनि एक खत झाडी। खरसाहणें लावी तेणेकरुनि खत एक झाडी। तेलसहाणे लावी तेणेकरुनि एक खत झाडी। तूपसहाणे लावी तेणेकरुनि एक खत झाडी। मग आपुलिये परीचा परज वाये। मग ती सुरी रायासी भेट करी। राव तयासी दायपसाथ दे। मग तो राव बैसला असे ते व्हेळी पुढां ठेवी: चाले ते व्हेळी हाती धरी: जेवी तियेव्हेळी मांडियेवरि ठेवी। निजते व्हेळी आडवांगीं ठेवी: ऐसा तियेसि केवेळांही विसंबेना। "–दृ०

## ९ आस्तिपरी.

[ हें नववें प्रकरण असून यांत तीन सरवळे आहेत; पहिल्यांत ४ दुसऱ्यांत१ आणि तिसऱ्यांत१ अशी ६ सूत्रे आहेत.

पहिला सरवळा ' साधनपर ' असून, दुसरा ' साधकपर ' आणि तिसरा ' साध्यपर ' आहे. हे प्रकरण ' लक्षणबंधकारांनी' विद्यामार्गानंतर दिलेलें आहे; परंतु "स्थल"कारांनी यावर अखेरीसच भाष्य केलें आहे. म्हणून आम्हीही तोच भाष्यकाराचा अनुक्रम स्वीकारिला आहे. ]

" अस्तीपरी हा व्याप्तीशब्द । अस्तीपरी म्हणजे ऐशिया परी असावे म्हणौनि निरोपिली परी असीजे म्हणौनि अस्तीपरी । कू-परी नसीजै । कव्हणे ठाइं असीजेः हाळिया पाळियासी ( हाळिया म्हणजे दहा पाचां घरांचियाः पाळिया म्हणजे अनिएत वासः ल. ब. ) झाडातळी असीजेः पर परी असीजे । ज्ञानाचा ठाइं परी असीजेः वैराग्यपरी असीजेः भक्तीच्या ठाइं परी असीजेः श्रीचक्रधराचिया स्वरुपाचे प्राप्तीचा ठाइं । "

"अस्तीपरीचेनि पहिले वचने इद्रियधर्म नियमविलेः दुसरेनि मनोधर्म सांडवीलाः जीवधर्म नियमवीले । तिसरेनि देहधर्म नियमवीले । चौथेनि अंतरबाह्य नीरर्थ धर्मयातीं वेगळा उपजे तो त्यजवीला । पाचवेनि अवघेया धर्मापासौनि काढौनि ईश्वरीचा गुणधर्मीं लावीला। सहावेनि वचने तेचि आठवण दुःखपूर्वक करावी । हे देहेपर्यत जो अनुष्ठी तयासि पुनरपि सबंध देति । हे देहे ईश्वरासि अर्पिले आन अहंता तर सांडिली नाहीं तर कैसें अनुसरण । "--भा० स्थळ

" तियेचा ( असतीपरिचा विस्तार आचारस्थला । अवघेनि आचार स्थलाचेनि आचरणे पुरुषभेदे मोक्षानुभूतीचे अधिकार होति असती । मा तर जीवसर्वाधिकार्या असतां अवांतर अधिकार तेचि कैसे होति असती पा । नाः जीव सर्वाधिकार्या म्हणितले तें तयाचें स्वरुप सर्वाधिकारी होए पर

तोचि स्वरुपीचा अधिकार क्रियाचरणे वाढवावा ।" " नसुधेनि ज्ञाने उद्धरण नाहीं म्हणौनि अस्तीपरि निरोपिली । तिये असतीपरीसि आधी नीषेध मांडविला । मग विधी विहिला । मा निशेष तोचि कवण पा । ना: सर्वज्ञे म्हणितलें: विकारविकल्पशून्य । मा तर विकाराची शून्यता कैसी करावी । काइं जीवस्वरुप पालटत असे । म्हणे ना: नित्य पदार्थी जर पालट म्हणितला तर तो अनित्य होइल । तेथ नित्यत्व कैचे राहिल । मा तर विकारशून्यता म्हणितली ते कैसी पा । ना: तया विकाराचे दोनी पक्ष । अधमति करुनि जर वाढविला तर मृत्तिकापर्यंत वाढत असे । सेवणातें पाववतीत असे । ना जर उर्धमती करुनि उर्व केला तर मोक्षानुभूति असे । मग तेथचि नित्यत्वे वेचरुप होउनि राहात असे । ऐसा जो विकार तयाचे ज्ञान जालेया अधगतीची वाढी तोडौनि उर्धगती करावेया निषेध करुनि गोसावी विधी आचरविला । तर निषेधरुप विकार तयाचे मूळ जेथौनि असेल तेथौनि तयाची शून्यता करावी । मा तर स्वरुपचि विकारवंत जाले. तयाची शून्यता काइ करावी असे । ना: न करवे ते तैसेचि: पर तयाचा अंकुर जेथौनि निगाला तो खुडिलेया तयाची शून्यता होत असे ।" आचार महाभाष्य. ]

१ वीकार— " इन्द्रियार्थसंबंधे अन्यथा होणे याते विकार बोलिजे । " —भाष्य.

" वीकार हा इन्द्रियधर्म: विकल्प हा मनोधर्म: परित्यजुनि परमेश्वर शरण रीगावे । " आचार पाठ ३-२५

"अपर धर्मांचे धारण याते विकल्प बोलिजे" आ. पा.१८-९

विकल्प—" नाथिली विशेष कल्पी म्हणौनि विकल्प । जडा पार्थिवा प्रतिमा तीर्थांचिया ठाइ अदृष्टत्वे कल्पी म्हणौनि विकल्प । " —भाष्य.

शून्य--" शून्यता म्हणजे अत्यंताभाव ।" " पदार्थांचा संबंध करावा विकल्पस्थानाची सेवा न करावी याते शून्यता बोलीजे । " —भाष्य.

"वीखो अनंता तापासि आश्रयो नरकासि हेतु म्हणितला । म्हणौनि आधी विकाराची शून्यता करविली । तर शाब्दीं शून्यता करावेया अर्थ जो विकार असे तयाचे तीन पक्ष । तर तेचि कैसे पा । नाः

"जडचेतनसंयोग पदार्थी एक विकार उपजे । दुसरा हे स्वभावे त्रिगुणात्मक विकृतीएचेनिसंबंधे उपजे । तीसरा पूर्व-प्रमादांत संस्कारें उपजे । ऐसया त्रिविधा विकाराची शून्यता करावी । " आचारमहा. भाष्य.

२ स्वभावमात्रे—" स्वशब्दे आपणपेः भावशब्दे याचे ( आपणपे ) वर्तन । मनाइन्द्रियायुक्त देहे:जो देहासवे उपजला तो अत्याज्य त्यजूंचि न सकीजे । त्यजावेया योग्ये ( शक्य ) नव्हे तो स्वभाव आठः आठांची चारी द्वंद्वेः क्षुधा--पिपासा मल-मूत्रः शीतल-ऊष्णः भय-निद्रा । "

"मात्रा म्हणजे न्यून्याधिक नव्हेः मपित ( नेमविले ) । यथा रसऔषधीवत तैसे एका सीताचे उणे पुरे न व्हावे । नीरोध स्वभाव जनित तो परिहरावा आन इंद्रियार्थ जनित तो सांडावा । " भाष्य.

" स्वभावासि नाश नाहीं म्हणौनि । तर विकारा स्वभावा भेद कैसा असे पा । नाः वीकार तो जीवस्वरुपीं मूळभूत असे । आन स्वभाव तो स्थूळ देहासरिसा उपजत असे । पर-तोही त्यजिला न वचे । म्हणौनि लक्षणकारे म्हणितलें प्रकृति-रुप ते अत्याज्य । एक प्रकृतिचा धर्म तो अत्याज्य । आन दुसरा प्रकृती धर्मासारीखा पूर्वप्रसादातुल प्रसवरूप तोही

अत्याज्य। मा तर प्रकृति .शब्द देह तया देहाचा धर्म तो स्वभाव। तयाचे दोनी भेद: क्षुधापिपासादि आठही ते स्वभाव आन आवघेया इंद्रियाचिया प्रवृत्ती ते इंद्रीयेधर्म। तया दोहीं धर्मासि रजस्तमें व्यापुनि वर्तति। हा प्रकृतिधर्म। ऐसे तिन्ही मिळौनि स्वभावशब्दें बोलिजेति। तया स्वभावातें सामान्य वाक्ये प्रकृति म्हणितले।" आ. म. भा.

३ निरालंबी—"जीवमनोरथादि आश्रयशून्यता ते निरालंबता।" वीकार व्यतिरिक्त जो अंतःकरणीं वेचु ते आलंबन। स्थाना वाचकः परिग्रहा वाचक। एक आंतरः एक बाहेर।" भाष्य.

४ देवतास्मरण—" ये प्रकरणीं देवता शब्द परमेश्वर। तो एक दृष्ट एक श्रुत। तयाची आठवण यातें स्मरण।"—भाष्य.

५ जो—" जो म्हणजे चौ वर्णांत भलताही लाभे। जो म्हणतलीया एकला जन्म क्षेपीः जेतुले जन्म क्षेपीति ऐसें न म्हणतीचि।" —भाष्य.

जन्म—" जन्म शब्द ज्ञानकाळी वर्तेः अनुसरणकाळी वर्ते म्हणौनि जन्म। शब्द देणें ते जन्म देणें कैसेः जैसा मातेचा पोटौनि निगाला केवळ तैसिया केवळा होऔनि परमेश्वरासि देयावें।" —भाष्य.

क्षेपी— " क्षेपणे शब्द लोटणें वर्ते। शारीर कष्ट मानसीक दुःख स्मरणसुख ऐसे शेलें लोटी यातें क्षेपणें म्हणिजे। शारीर कष्ट म्हणितलेया सुख तेंहि नेघावें।" " मानसिक दुःख म्हणजे ईश्वरे जे पर्था विहिली तयासि प्रतिबंध न करावा। उचित जें सुख तेंही नेघावें। मानसीक दुःख म्हणजे आर्ती निर्वेद।" भा.

"क्षेपणें म्हणजे शारीरकष्ट। मानसीकदुःख म्हणजे तया शारीर कष्टांमध्ये अटण विजन भिक्षा भोजन स्मरण मानना-

दिक जेतुलीही उठी बैसी तेतुलीही बोलेया कोरडेया पुरुषाचि सारिखीचि असे । तैसी मानसीक दुःखाची नसे । कां जे तयाचे दोनी भेद असत म्हणौनि । तर तेचि कैसे । एक दुःख वोलें दुसरें कोरडें: तर वोले ते कैसे । नः निर्वेद अनुताप अनुशोच आर्ती करीतां आश्रुपतांचीया धारा लागती । तयासारिखे कोरडे नव्हेति । तर तेचि कैसे । नाः कोरडे या पुरुषासीं चतुर्विध जर दुःख उपजे तर सुस्कार घालीति पर डोळां कांहींचि कांकरेना मग अश्रू गळ-तील काइ । "—आ. म. भाष्य.

तेयासी--" जेणें विकार विकल्पाची शून्यता केली: स्वभाव नेमीला: आलिंबन त्यजीले: देवता स्मरणेसि जन्म क्षेपीले तयासी ।"

पुनरपि आपुला संबंध—" पुनरपी संबंध तो ज्ञानकाळीचिया संबंधातें साधी । " " प्रतीती होआवेया एक कृपालक्ष मनो-धर्म व्हावाची । " " जो उद्धरिला सांगीजे ते नसुद्धेनि दर्शने नव्हे । "

" आपुला म्हणजे मूर्तीचाः स्वरुपाचा नव्हे: तो तयातचि देओं सरला मग वियोग नाही म्हणौनि । "—भाष्य

" संबंध म्हणजे योग । देति म्हणजे नित्यत्वें: मग असंबंधीं नाहीं ।"—भाष्य.



# भाषाशास्त्रविषयक टीपा.

" पान १ ओळ १ "—कन्हणें करणें=कोणत्याही साधनानें. कः पुनर् ( संस्कृत )—को उण ( प्राकृत )—कवुण–कवण ( अपभ्रंश )–कन्हण–कोण ( मराठी );

( अ ) व्यजनान्त शब्द संस्कृतांतून प्राकृतांत येतांना अंत्य व्यंजनाचा प्रायः लोप होतो; जसें:—यशस् ( यश ), जगत् ( जग ) पुनर् ( पुन );

( आ ) प बद्दल व अक्षर येतें; जसें:—दीप–दिवा, कूप–कुवा, कच्छप-कासव, पुनर्–पुन–वुण.

( इ ) ह्कारयुक्त उच्चार होतो; जसें:—भणे–म्हणे, तीनी–तीन्ही, कवण–कन्हण.

[ तेयाचे–तेआचे–तेहाचे, हें हकारयुक्तरूप सन ११८७ परळचा शिलालेख व १२०८ खानदेश पाटण शिलालेख यांत दिसून येतें. ]

( ई ) कन्हण याचा सामान्य सर्वनामाप्रमाणे उपयोग होतो. कधीं कधीं 'एक' शब्द यापुढे येतो. 'आपणातें कन्हणी नेणेः आपण कन्हणातें नेणिजे ऐसिया ठाइं असावे ।' ( आचारपाठ सरवळा ४०, सूत्र २ ); 'वोखटें करितसातां कन्हणी गोमटियातें न पवे ।' ( आचारपाठ सर० ७२–सूत्र १ ); ' साधे हो कन्हणाते कांही असेः सकळही देवाचे कींः देव दे तें आपुलें ।' ( आचारपाठ ५१–२ )." कन्हणि एकी अवसरी सकळही मळाचें परिसारण करूनि " ( पान ११ ओळ ३ )

"ओळ २—" मुचिजेना=मुक्त केले जात नाही; मुच्यते ( संस्कृत)—मुचियते–मुचिज्जते–मुचिजते–मुचिजइ ( प्राकृत )–मुचिजे ( प्राचीन मराठी ).

( अ ) सुलभोच्चारासाठीं संयुक्त व्यंजनें अलग करणें; प्रताप–परताप, प्रमाण–परमाण, श्लोक–शिलोक, मुच्यते–मुचियते.

( आ ) य चा ज होणें; अद्य-अज्ज–आज, यम–जम, यः–जो, मुचियते–मुचिजते.

( इ ) ति–ते प्रत्ययांतील त् चा लोप; जसें– हसति–हसइ, भवति–होइ, देति–देइ, मुचिजते–मुचिजइ–मुचिजे. [ ‘ गाइजे ’ कर्मणिरूप सन १९२९ अभिलषितार्थचिंतामणि ]

( ई ) मुचिजेना–अकरणरूप; हें रूप अन्य तऱ्हेनेंही होत असे.

१ होति–न होति–नव्हति–नव्हेति (पान २); जाणिजे–नेणिजे (पान ४); ३ उरे–नुरे ( पान १० ); ४ अनुसरति–ननुसरति ( पान १० ), होए–नव्हे–नाहीं ( पान १० पान १२ ); इत्यादि.

“ एकें परमेश्वरें वीण ” एका परमेश्वराशिवाय. विना–विण–वीण; संस्कृतांत विना याला तृतीयेची अपेक्षा आहे. तीच गोष्ट येथें अजून कायम आहे. उदा०–“परिश्रवणे” वीण सुख न पविजे: आणिकें परीं ॥ ओवी १० वत्सहरण; “ तोवांचौनि ” सदैव कविजन: आन काइ वानिती ॥ ओवी ४९ वत्सह० (अ) वर्तमान मराठींत शब्दयोगीअव्ययापूर्वी विभक्ति न योजतां सामान्यरूप योजतात; पण प्राचीन मराठींत निरनिराळ्या विभक्त्या येतात. द्वितीया, तृतीया, चतुर्थी, षष्ठी एवढयाच विभक्त्या योजलेल्या दिसतात; ही चाल रामदासांनंतर लोप पावली व सामान्यरूपाचा उपयोग सुरू झाला.

(आ) “ एके परमेश्वरें ” यांत विशेषण व विशेष्य यांची विभक्ति, लिंग, वचन एकच ठेविलेलें आहे. हा प्रकार वर्तमान मराठीत क्वचितच दिसतो. जसें–आतां सांडा अन्यभजनें: कां नाइकां वेद पुराणें । मुंचिजे ना “ आनां कव्हणें:” एकु श्रीकृष्णसेवा । वत्सहरण ओवी ४०; [‘इयां पाटणीं’ सन १२०८ खानदेश पाटण शिलालेख ] ‘ खालिली युगी ’ ( पान ३ ).

( इ ) रामेण ( संस्कृत )–रामेण ( महाराष्ट्री )–रामेण–रामें ( अपभ्रंश)–रामें ( जुनें मराठी )–रामानें ( वर्तमान मराठी ); अपभ्रंशांतील रूपांवरून असें दिसतें कीं, रामेण–रामेण्–रामें अशाप्रकारें ण चा अनुनासिक बनवून रूप तयार झालें. रामेण या रूपापेक्षां रामें हेंच रूप जास्त प्रचारांत आलें. रामानें असें रूप रामदासाच्या काळांत दिसूं लागलें. [ ‘चावुंडराजें ’ सन ९८३ गोमतेश्वर शिलालेख; ‘जेणें’ इ११२९ अभिलषितार्थचिंतामणी; ‘श्रीचंग-

देव दंडनाकें ' सन ११५७ पळसदेव शिलालेख; ' गाढवें ' सन ११८७ परळ शिलालेख; 'मगरें,' ' गिधवें ' 'मढीचेन मापें' सन १२०८ खानदेश, पाटण शिलालेख; ' श्रीरामचेंद्र देवराएं ' ' लाखण नायकें ' ' राघेण ' पंढरपूर चौऱ्यायशीचा शिलालेख सन १२७४-७७; ' हरीहरप्रसादें ' सन १२८९ उनकेश्वर शिलालेख ] ' रामाने' असें रूप सांपडलें कीं, तो लेख रामदासाच्या सुमाराचा अगर त्यानंतरचा समजावा.

ज्यावेळी तृतीया दोनदां योजावी लागते त्या वेळीं दोन्हीं प्रकारचीं रूपें विविधत्वासाठीं योजतात. जसें-नागार्जुनाचेनि प्रसादें । परमपुरुषाचेनि बोधें । वत्सहरण ओवी ६; साधुसंगाचेनि भांडवलें । ज्ञानमार्गीचा व्यवसाऊ फळे ॥ जो न जोडे पुण्याचेनि बळे । ब्रह्मादिकांशी ॥ शिशुपालवध ओवी ७३. नागार्जुनाच, परमपुरुषाच इत्यादि षष्ठी विशेषणाची रूपें यांत दिसत आहेत.

" तोचि "—तोच; चित् ( संस्कृत )-चिअ ( महाराष्ट्री )-चि ( जुनें मराठी )-च ( वर्तमान म. ).

" परमेश्वरु "—परमेश्वरः ( संस्कृत )-परमेश्वरो ( महाराष्ट्री )-परमेश्वरु ( अपभ्रंश व जुनें मराठी )-परमेश्वर ( नवें मराठी ); जसें;-नीराकारु, साकारु ( पान १ ) धर्मु, अधर्मु ( पान ३ ) सहस्रु, वेधु ( पान ४ ), एकु, वर्गु, प्रपंचु ( पान ५ ), बोधु ( पान १० ), इत्यादि.

ओळ ३—" नीर्वेव " ( निर्+अवयव )=अवयवरहित; अवयव ( संस्कृत )-अवयव-अवइव ( प्राकृत, अपभ्रंश )-अवेव ( मराठी ); निर्+अवेव=निर्वेव-नीर्वेव.

( अ ) अवयव या शब्दांत दोन व मध्यें य आलेला आहे. त्याचा स्पष्ट उच्चार व्हावा म्हणून य वर आघात येतो; त्यामुळें य चा इ होऊन, मागील अ मध्यें तो मिळतो म्हणून ए अक्षर होतें. जसें-दास्येमोचक, दत्तात्रए ( पान १ ) चैतन्ये ( पान २ ), शाक्तए ( पान ४ ), कार्यें ( पान ५ ).

( आ ) उच्चार दीर्घ करण्याची लकब, जसें-हारिहर ( पान २ ), वीश्वरूप ( पान २ ), आंतराळ ( पान ३ ), वीद्या ( पान ४ ), इत्यादि.

[ सन १२०८ पाटण 'वीसोबा'; सन १२८९ उनकेश्वर 'हारीहर' 'वाचीता' 'वीजैया' ]

" सावेवो "—सावयव–अवयवयुक्त; यकारान्त, वकारान्त, व हकारान्त शब्दांपासून मराठींत जीं मूळरूपें य–व–ह यांचा लोप होऊन बनलीं त्यांचें एकवचन ओकारान्त नियमानें होतें; जसें:—

सं. प्रा. अप. जुनें मराठी

विस्मय–विस्मअ–विस्मअ–विस्मा+उ=विस्मो

देव—देउ—देउ—देअ+उ=देओ–देवो

विखो ( पान ५ ), चांगदेवो, चांगदेओ, देओयोनी ( पान २ ), स्वभावो ( पान १० ), क्षयो ( पान १० ) इत्यादि.

[ परमेश्वरु, सावेवो यासारखी रूपें जुन्या शिलालेखांत दिसतात. ११२९ अभिलषितार्थचिंतामणी 'नारायणु'; सन ११५७ पळसदेव 'दाउ, पसाउ, सकु, साहस्रु'; सन ११८७ परळ 'कोणु; सन १२८९ उनकेश्वर 'नाएकु' 'सोमदेयो' 'पंडितु' 'सरणुनाएक' 'संपूर्णु' 'रामु, प्रासादारंभु, कटिग्रामु' ]

ओळ ४ होए–अवतरे–दे; भवति–भवइ–होइ; तरति–तरइ–तरे; ददाति-देति–देइ–दे; होए हें अस् धातूचें रूप नव्हे. होइ–होन्ति ( सिद्धहेमचंद्र सूत्र ( ८–४–६० ), भूत–हुअ ( ८–४–६४ ), भूत्वा–होऊन-होअऊन ( ८–४–२४० ). भविष्यामि-होस्सामि-होहामि ( ३–४–१६९ ) होए ( एकवचन, तृ. पु. ), होति ( तृ. पु. अनेकवचन ); होए-होति–नव्हे–नव्हेति; असे ( पान १ )—असेति–असति ( पान ६ ); रचि–रचिति ( पान ७ );

पान १ ओळ ६—जैसे; यादृश ( संस्कृत )–जइस ( अपभ्रंश )–जैस ( मराठी ). कीदृश–कइस–कैस–काइस; तादृश–तइस–तैस; एतादृश–एआ-इस–ऐस; अन्यादृश–अण्णारिस–अण्णाइस–अनाइस( अनायासें )–अनारिस;

( अ ) क–ग, च–ज, त–द, प, य, आणि व हे नऊ वर्ण असंयुक्त असून शब्दाच्या आरंभीं नसतील तर त्यांचा प्रायः लोप होतो. जसें नदी–नई, गदा–गआ, वदन–वअण.

( आ ) ऋ बद्दल रि होणें; जसें–ऋद्धपुर–रीधपुर, यादृश–याद्रिस–यारिस–याइस–जाइस–जइस–जैस.

द्वापरी–सप्तमीचें एकवचन. सप्तमीचे एकवचनी ई वर अनुस्वार विकल्पानें दिला जात असे. सैह्याद्रीं ( पान १ ), रुधपुरी ( पान १ ) प्रत्येस्थानीं ( पान १ ). सैह्याद्री ( पान २ ) [ सन ११५७ पळसदेव शिलालेख 'प्रासादी'; 'इयां पाटणीं' 'श्रीतेग्रामी' सन १२०८ खानदेशपाटण; सन १२८९ उनकेश्वर 'वनवास प्रसंगी' ' श्रेतायुगी ' ' सांगवीये ' ( सांगवी गांवीं ) ]

पान १ ओळ ८–" राउळ "=रावु–राव, बहुमानार्थी. राजन्–राज–राजु–राउ+ल राउल; जसें–पादुका–पाउ पाउल, कृष्ण–कन्ह–कान्हुल, विष्णु–विठ्ठु–विठ्ठुल–विठल, छाया–सावली. या सर्व शब्दांत नामाला ( अ ) ल प्रत्यय लागून वत्सलता व अल्पार्थता व्यक्त केली जाते.

( आ ) ज चा लोप; जसें–रजक–रअअ, प्रजापति–प्रआवइ, गज–गअ, ( इ ) राउळ याचा राजवाडा, मंदीर असा अर्थ असेल तर व्युत्पत्ति निराळी राजकुल ( राजवाडा )–राअउल–राउळ; जसें– देवकुल– देवउल–देअउल देउळ–देऊळ–देवळ. [ मग राउळां आलें चक्रपाणीः सत्यभामेचिया । शिशुपाल वध ओवी १६६; वसुंधरेचां राउळगणींः साधु स्थापिलें । शिशुपालवध १५८; या दोन ठिकाणीं 'मंदिर ' असा अर्थ आहे; ऐसें काईसें वो निढाळपणः सर नव्हे तुझें कारण । सामानु खेॐ राउळ आपणः बैसले असती ॥ शिशुपालवध ओवी १७९; येथें राउल हें राव या अर्थी आहे.

[ सन १२०८ खानदेश पाटण ' राउला ' ]

पान २ ओळ ४ आतांस्था–आतांशीं–सध्यां. हें एतस्थाम् याचा अपभ्रंश दिसतें. ओळ ५–आजी–अद्य–अज्ज–आज–आजी ( सप्तमी )

येथें जोडाक्षरांतील पहिल्या वर्णावर दुसऱ्या वर्णांचा संस्कार झाला आहे; जसें:–कार्य–कज्ज–काज; कर्म–कम्म–काम, सप्त–सत्त सात, शब्द–सद्द–साद. ( Law of assimilation, change conditioned by Rhythm and quantity शब्दाचा तोल संभाळणें. )

पान २ ओळ ८ " पर "–परंतु ( उभयान्वयी अव्यय ).

" परि ' हें शब्दयोगी अव्यय असल्यास त्याची व्युत्पत्ति 'उपरि–परि–पर' अशी होते; यांत आद्यवर्णाचा लोप झालेला आहे; जसें–अरण्य–रण्य–रान, अरघट्ट–रहट्ट–रहाट; " चैतन्या पर परमेश्वरु " ( पान ३ ).

" परि " याचा अर्थ प्रमाणें–प्रकारें असा असल्यास व्युत्पत्ति पुढे दिल्याप्रमाणे होते. प्रकारीं–पआरीं–परीं ( परी ); जसें:–कुम्भकार–कुम्भआर–कुम्भार, सूत्रकार–सुत्तआर–सुतार;

( अ ) प्र बद्दल प येणें; जसें–प्रभात–पभात–पहाट, प्रसाद–पसाद पसाअ–पसाय.

पान ३ ओळ ३ "बत्तीस"–द्वात्रिंशत् ( संस्कृत ); त्रिंशत्–त्रिंश–तीस; द्वा–वे–बे–ब ( सिद्धहेमचंद्र ८–३–११९ ).

पान ३ ओळ ६–खालिली युगी–खालच्या युगांत; विशेषण व विशेष्य यांची सप्तमी विभक्ति योजलेली आहे. खन्–खात–खाअ–खाल–खालि; खालि+ इल–खालील.

(अ) ( संस्कृत ) इल ( महाराष्ट्री ) इल्ल ( मराठी ) इल;

| सं. | अर्धमागधी महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| प्रथम | पढमिल्ल | पहिल |
| उपरि | उवरिल्ल | वरिल |
| पुरस् | पुरिल्ल | पुढिल |

वर्तमान मराठींत वरल, पुढल, बाहेरल असा उच्चार करितात; त्यामुळें नुसता ' ल ' प्रत्यय लागल्याचा भास होतो. परंतु हा ' ल ' जुन्या मराठींतील ' इल ' प्रत्ययाचा अपभ्रंश आहे.

पान ३ ओळ ८ सोळा—षोडशन् ( संस्कृत )–सोळह ( महाराष्ट्री )–सोळा ( अपभ्रंश )–सोळा ( मराठी ); दशन्–दश–दस–दह; षो+दह= षोडह–षोळह–सोळह–सोळअ–सोळा.

( अ ) ड बद्दल ळ होणें; जसें–दाडिम–डाडिम–डाळिम–डाळिंब; गुड–गुळ–गूळ; हुरडा–हुळा.

पान ३ ओळ ११ "आठ"–अष्टन् (सं.)–अट्ठ (महाराष्ट्री)–आठ-(मराठी);

(अ) ष्ट बद्दल ट्ठ होणें; जसें:–पृष्ट–पट्ठ–पाठ; दृष्टि-दिट्ठि-दीठि; नष्ट–नट्ठ–नाठ (नाटाळ), ओष्ट–ओट्ठ–ओठ; अग्र (ओळ ५) यावरील टीप वाचावी.

पान ३ ओळ १४ " च्यारि "–चत्त्वारि (संस्कृत, प्रथमा)–चत्तारि (महाराष्ट्री)–चआरि चारि (अपभ्रंश)–च्यारि, चौघ, च्यार्‍ही (मराठी).

पान ३ ओळ १९ अधोनिक—(अधः+योनिक)= (अधो+योनिक)= (अधो+निक)= अधोनिक.

पान ४ ओळ ४ चहु=चार; चतुर-चतु–चउ–चहु.

" युगिचां धर्मी–युगीच्या धर्मी; 'युगिचां' हें विशेषणात्मक षष्टीचें सामान्यरूप आहे. संस्कृत तालव्याचा 'चा' उच्चार हाच मराठींत 'च्या' असा लिहावा लागेल. उदाहरण—" तेयां श्रीचक्रधराचां चरणकमळीं: लुंठतसे ॥ ओवी ५ शिशुपालवध, (सन १२७३ ज्ञानेश्वरीपूर्वी १३ वर्षें;) जैसा विकाशु पद्मिनीः उदैलिआ तरणीं ॥ तैसें संतजनाचां मनीं: श्रीकृष्णचरित्र ॥ (ओवी २६ वत्सहरण; ज्ञानेश्वरीपूर्वी सन १२६२ ते १२८५ च्या मध्यंतरीं) [सन १२८९ उनकेंश्वर, ' सरभंगाचआ आश्रमा; "]

पान ४ ओळ ४-५ नेणिजे, पाविजे–पान १ ओळ २ वरील टीप पाहा; प्राप्य–प्रापिज्ज–पाविज्ज–पाविज;

पान ४ ओळ ९ " सवाव "–सपाद (संस्कृत, एक चतुर्थांश युक्त) सपाअ–सवाअ–सवाव–सव्वा (वर्तमान मराठी),

पान ४ ओळ १० " बाहातरि—द्वि–सप्तति (संस्कृत); सप्तति–सप्तइ–सत्तइ–सत्तरि–हत्तरि (महाराष्ट्री);

(अ) स् चा ह् होणें; जसें–सिंधु–हिंधु–हिंदु; सप्त–सत्त–सात–हाट (बाजारहाट–आठवड्याचा बाजार). स चा ह गुजराथेच्या बाजूला विशेष होतो.

पान ५ ओळ ७ " विखो "—विषय (संस्कृत)–विषयो–विषओ–विखओ–विखो

( अ ) ष चा ख होणें; जसें–हर्ष–हरिख, पुरुष–पुरिख, दक्षिण–दख्खन,

पान ५ ओळ ११ " ठाइं "–स्थानीं; स्थान–ठाण–ठाअ–ठाय (ठाव) ' ठाइं ' सप्तमी विभक्ति.

( अ ) स्थ चा थ–ठ होणें; जसें–स्थविर- थेर–( थेरडा ); आस्तरण–आथरण–हाथरण–हातरण–हांतरुण.

( आ ) आदिवर्ण लोप होणें; स्फुट्–फुट्, स्फुर्–फुर्.

पान ६ ओळ ३ "प्रउर्ती"–प्रवृत्ति ( संस्कृत )–प्रव्रुति–प्रवुर्ति–प्रउर्ति.

(अ) सुलभोच्चाराची लकब; जसें–दृष्टि–द्रुष्टि, सदृश-सद्रिश–सरिस,

पान ६ ओळ ४–५ "उपजवी"–उत्पन्न करते; उत्पद्य–उपज्ज–उपज; 'उपजवी' हें प्रयोजकरूप आहे.

| संस्कृत ( आपय ) | महाराष्ट्री ( आव ) | मराठी ( अव ) |
|---|---|---|
| उत्थापयति | उठ्ठवेइ | उठवी |
| रोपयति | रोव्वेइ | रोवी |
| करापयति (कारयति) | करावेइ | करवी |

" डोचळी "–दुःचालयति, " उगळी "–उद्गिरति–उद्गिलति–उद्गिलइ–उगिळइ–उगळी;

पान ६ ओळ ७ " घेउनि "–गृहीत्वा ( संस्कृत )–घेत्तूण ( महाराष्ट्री ) घेऊन ( मराठी )–घेउनि ( इ पादपूरक );

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| भूत्वा ( भू ) | होऊण–होअऊण, | होऊन. |
| जित्वा ( जि ), | जेऊण, | जिणून. |
| हसित्वा ( हस् ) | हसिऊण | हसून |
| " त्वा " | " ऊण " | "ऊन"–"ऊनि"–"उनि" |

( अ ) अपभ्रंशांत करेवि, पालेवि वगैरे इकारान्त अव्ययें होतात, त्याप्रमाणें ऊन प्रत्ययान्त अव्ययाला जुन्या मराठींत इकार नेहमीं लागतो. केवळ अकारान्त रूपें जुन्या मराठींत नाहींत.

( आ ) अपभ्रंशांत प्पिणु, पिणु, विणु असे उकारान्त प्रत्यय ह्या अव्ययाचे आहेत त्याप्रमाणें उकार पादपूरक लावण्याचीही पद्धति आहे; जसें— करूनु, घेऊनु, ह्सूनु,

( इ ) घेऊन+इयां=घेऊनियां, म्हणून—इयॅा=म्हणूनियां; इयाँ हें पादपूरक पुढील प्रमाणे झालेलें आहे; संप्रेक्ष्य—सॅापेहिय—सॅापेहिया, क्ष्य—क्षिय. य—इय. इय+आ=इया. सारांश, त्वा प्रत्ययापासून ऊन व य प्रत्ययापासून इया असे दोनी प्रत्यय जुन्या मराठींत एकामागून एक एकदम लागतात.

[ "ज्ञानेश्वरींत" करून—करुन अशीं रूपें नाहींत. नेहमीं नु किंवा इ—इया हें पादपूरक असतात; इ ज्ञानेश्वरानंतर लोप पावली. "पंचतंत्रांत" ( भारत इतिहास संशोधन मंडळ त्रैमासिक, वर्ष ३ अंक २—३—४— ) इया ( आइकोनिया ) रूपें जर शेंकडा ३ सांपडलीं, तर औनि (पासौनि, लागौनि) अशीं शेकडा ३३ सांपडतात; उनि ( करुनि, म्हणउनि) अशा तऱ्हेची शेंकडा ५० च्या वर सांपडतात; ओनि ( पासोनि करोनि ) अशा प्रत्ययाचीं शेंकडा १५सांपडतात; "लीलाचरित्रांत" (ज्यांतून प्रस्तुत पुस्तकांतील सूत्रे निवडलेलीं आहेत त्यांत ) ओन प्रत्ययान्त रूप दिसत नाहीं; देखौनि, म्हणौनि अशा तऱ्हेचीं रूपे साधारणपणें शेंकडा ४३ दिसलीं; करुनि, दाउनि अशा तऱ्हेचीं शेंकडा ३७ दिसलीं; म्हणौनियां, पारिखौनियां अशीं शेंकडा १९ दिसलीं. इ. स. १३४७ नागांवच्या शिलालेखांत म्हणौनि, लागौनि अशीं रूपें सांपडतात; मंगळवेढें काशी विश्वेश्वराचें देउळ शिलालेख ( सन १५७२ ) यांत करुनु, चाळवुनु, म्हणुनु, वाजउनु अशीं रूपें आलेलीं आहेत. सारांश, अगदीं जुन्या मराठींत म्हणौनि असें रूप सर्वांत जास्त प्रचारांत दिसतें. त्या खालोखाल करूनि, दाउनि अशीं रूपें दिसतात ]

पान ६ ओळ १२ " जन्मौनि; " हें प्रयोजकरूप आहे.

पान ६ ओळ १३ " कां "—उभयान्वयी अव्यय; अथवा—किंवा अशा अर्थी, याच अर्थी 'कीं' अव्ययही उपयोजिलें जातें; जसें—भक्त भेदें अनुभवी कीं अभेदें अनुभवी ऐसे वीकल्प तेथ करूं न एति । ( पान १३ )

' कां ' प्रश्नार्थकही योजिलें जातें; जसें–मग जीव प्रपंचातें रचीतिःकां: रचितिः जे अधमति अधगति अधरति म्हणौनि रचीति। (पान ७ ओळ १);

पान ६ ओळ १४ " असणे "—असणीय–असनीय–असण ( असणें ); मरणीय–मरणीय–मरण ( मरणें ); दर्शनीय–दखणीय–देखण; हा क्रियावाचक नामाचा प्रकार गमन, पठन, यापेक्षां निराळा आहे; मला पुस्तक वाचणें आहे=मया पुस्तकं वाचनीयम् अस्ति; पुस्तकस्य पठनम्=पुस्तकाचें पठण करणें; पहिल्या प्रकारांत सकर्मक धातूंना कर्म येतें; पण दुसऱ्या प्रकारांत तसें होऊं शकत नाहीं. ' मया पुस्तकम् पठनम् अस्ति ' हें वाक्य चुकीचें होईल.

पान ६ ओळ ६ " जन्मला सांतां "—जन्मास आलेला जीव ( जातः सन् जीवः ); सत् (संस्कृत)–सन्त ( प्राकृत )–सॅात (प्राचीन मराठी) असतां ( वर्तमान मराठी ); ' सँात ' याला पुल्लिंगाच्या वेळीं आं प्रत्यय लागतो.

भवत् ( संस्कृत )–होन्त (महाराष्ट्री )–होंत (मराठी); प्राप्नवत्–पावन्त–पावँत; ददत्–देन्त– देँन्त; भणत्–भणन्त–म्हणत. इत्यादि. ' जन्मलासांतां ' ही सति सप्तमी नव्हे; ' जन्मलासांतां जीव क्षणपर्यंत सुध असे ' यांत शुद्ध असणारा व जन्मणारा जीवच आहे म्हणून येथें सति सप्तमी होऊं शकत नाहीं.

पान ६ ओळ १७ " उजळे "–शुद्ध होतो; " मैळे "–मलीन होतो. उज्वलति–उज्जलति–उजलति–उजळति–उजळइ–उजळे; मलीन–मइल–मैल–मैळ;

पान ६ ओळ १९–आनांचा करणा तेयाभिमान=अन्याच्या कार्यांत जीवाला अभिमान. अन्य–अन्न–आन; ' आनाचां ' हें विशेषणात्मक षष्ठीचें सामान्यरूप आहे; ' करणा ' हें सप्तमीचें रूप होय. 'तेया' हें षष्ठीचें एकवचन आहे. ( 'चहुयुगाचा धर्मी' यावरील टीप पाहा. )

पान ७ ओळ २ 'जे'–यत् ( संस्कृत )–य–ज; हें मराठींतील 'कीं' या उभयान्वयी अव्ययाप्रमाणें जुन्या मराठींत योजलें जात होतें. 'कीं' ( that ) हें अव्यय मुसलमानांच्या भाषासंसर्गामुळें मराठींत आलें. ज्ञानेश्वरकालीन वाङ्मयांत 'कीं' आढळत नाहीं. 'तो असें म्हणाला कीं...' अशी रचना मुसलमानांचा संबंध आल्यानंतर भाषेंत शिरली.

पान ७ ओळ ४ "आति"=अस्ति; अस्ति–अत्थि–आथि आति; नास्ति–नात्थि–नाथि–नाहि.

पान ७ ओळ ६ " रीगे "—निर्–गा–निर्गा–निगा–रिगा;

,, ,, बुझे—बुध्य–बुज्झ–बुझ–; जसें–मध्य–मज्झ–माज–माजि;युध्य–जुज्झ–जूझ; बुध्–जाणणें.

पान ७ ओळ १७ " मार्गौति "=मागाहून; मार्ग–मग्ग–माग;–मार्गतः–मागतः–मागुतः–मागुता; जसें–पुरतः–पुरता–पुरौते ( पुढतीं );–निरतः–निरुता–निरौते; स्वतः–स्वता; अंशतः–अंशता.

पान ७ ओळ १८ " वोळगे "—अवलगति–अवलगइ–वोळगइ–वोळगे.

पान ८ ओळ ६ " वेगळा "—विलग्न ( सं. )–विलग्ग–विलाग–वेगळा ( वर्णविपर्यय झालेला आहे ); जसें–तिलक–टिकला; हिंस-सिंह;

पान ८ओळ ९ " सकळै " –सगळे; (अ) सकलिक-सकलिअ–सकलइ–सकलै ( ब ) सकल+अपि; अपि–अभि–अहि–अइ; सकल+अइ=सकलइ=सकलै; " शक्ति शब्दें सकलै देवता " ( पान ८ सरवळा १९ ) 'सकळाही शक्ति अधिना होति " ( पान १२ सरवळा २८ ) " ऐस्वर्यादिकरुनि सकळै धर्म मायासंबंधेंचि तेथ" ( पान ९ ओळ ९ ).

पान ९ ओळ १६ "वोते'–अवतरति ( सं. )–अवतरइ (प्रा.)–ओतरइ–ओतरे–वोतरे–वोते;

पान १० ओळ ११ " परा गिरा करुनि ' परा गिरा ' हे शब्द तृतीया विभक्तींत आहेत. ' करुनि ' हें शब्दयोगी अव्यय आहे.

"एं, करौनि, नि, इये प्रत्यये जेआ शब्दाचेआ अंतीं असति तेआ शब्दाची तृतीया विभक्ति जाणावी"—पंचवार्तिक ( भीष्माचार्यकृत )

पान ११ ओळ ९ " येतें विघ्न "—येणारें विघ्न; विघ्न शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे, पण जुन्या मराठींत तो नपुंसकलिंगी झालेला आहे.

पान ११ ओळ ११—तोकडेनि–थोडयानें; स्तोक–त्थोक–थोक–थोकड–थोडकें ( वर्तमान मराठी ). वर्णविपर्ययाचें उदाहरण. 'तोकडेनि' ही तृतीया आहे.

"आमुचेया काजाचेनि पाडे। देखती आपलें जीवित थोकडें॥ज्ञानदेवी॥"१-११२

पान ११ ओळ १२ "जेतुलेनि–तेतुलेनि=तेवढा, जितका, जसा;तेवढा–तितका–तसा अशा अर्थी.

(१) यावत् (संस्कृत)–जेत्तुल (अपभ्रंश)–जेतुल ( मराठी ). (२) यावत् ( संस्कृत )–जेत्तिअ (अप.)–जेती–जेति (मराठी). जेत्ति+क=जतुक=जितक–(मराठी). (३) यावत्–जेवड–जेवढ (४)यावत्–जेतुल–जेउल;[ सिद्ध हेमचंद्र ८–४–४०७, ८–४–४३५ जेवडु 'अन्तरु रावण–रामहं। तेवडु अन्तरु पट्टण–गामहं ॥ ]

पान ११ ओळ १४ "नेवो एति–" नेण्यास येतात. नेतुम–नेउं–नेओं–नेवों; पठितुम्–पठिउ ( महाराष्ट्री )–पठुं–पढुं–पढों ( मराठी ); भवितुम्–होऊं–होवों;

पान ११ ओळ १७–" वास "–वाट, जागा, स्थान.

( अ ) अवकाश–अवआस–अवास–वास ( जागा, स्थान ); अ चा लोप ( सिद्ध हेमचंद्र ८–४–१७९ ' अवात्काशो वासः ' । ) ( आ ) वासना–वास ( इच्छा, अपेक्षा ) जैसें डोळेयां अंजन भेटे। तेव्हलि दृष्टीसि पाटा फुटे। मग वास पाहिजे तेथ प्रकटे। महानिधी ॥ ज्ञानदेवी १–२३ओवी.

वासस् ( वस्त्र ), निवास–वासु (वसति), वर्ष–वरिस–वासो, या शब्दाशीं वरील शब्दाचा संबंध दिसत नाहीं.

पान ११ ओळ १७–१८ " आळविति " " डंडळवीति "–आलाप–आलाव–आळव–आळवति; ' डंडळवीति ' हें पौनःपोन्यवाचकरूप आहे. डंडल्ल ( महाराष्ट्री )—दंदलणें ( मराठी ). भांभावणें. केंकाटणें, तातडणें, चांचपणें इत्यादि इतर पौनःपोन्यवाचकांचीं उदाहरणें मराठींत अनेक सांपडतात.

पान १२ ओळ १९ " कृपाशक्ति करुनि "—' शक्ति ' हा शब्द तृत्तीयेत आहे, व ' करुनि ' हें शब्दयोगी अव्यय तृतीया दर्शवितें. ( अज्ञानछेदेंकरुनि, पान १३ ).

पान १३ ओळ ४ "तळिल हाणितलेयां वरिचील पडे उतरडि गडबडी"—खालीं आघात केल्यानें, एकाखालीं एक उतरत ठेवलेलीं भांडीं गडगडां पडतात; ' तळिल ' हें ' तळ ' शब्दाला ' ल' ' प्रत्यय लावून विशेषण बनविलेलें आहे. वर–वरच–वरचिल;

" तळिल हाणितलेयां हे सति सप्तमीचे उदाहरण आहे. " तलस्थिते घटे घातिते "

" उतरंडि "—अवतरत्+भंड; अवतरत्–ओतरन्त–उतरत; भंड, हंड; उतरन्त+हंड=उतरंड;

" गडबडी "—हा अनुकरणात्मक शब्द आहे. गडगडा लोळणें व आवाज होणें असे दोन ध्वनि या शब्दांतून निघतात.

पान १३ ओळ ६ " साध्याचिया प्राप्ति "—साध्य मिळालें असतां; ही सतिसप्तमी आहे. " साध्ये प्राप्ते साधनं निवर्तते "

पान १३ ओळ ८ " समोर "=सन्मुखर–संमुहर–संमोहर–समोर मख–मह, सखी–सही––सई, लिखति–लिहइ–लिहे; यांत ख चा ह झालेला आहे.

"पान" १३ ओळ ९ "आपणपें–" आपण होऊन. आत्मन् शब्दापासून हें भाववाचक नाम तयार झालेलें आहे. आत्मन्–आम्तन्–आप्पन्–आपण; यांत वर्णविपर्यय होऊन शब्द आपण असा झाला. आत्मन्+आत्मन्=आत्मात्मन्; यापासून भाववाचक 'आत्मात्म्यम्' संस्कृत त्म्य, महाराष्ट्री प्प, असा फरक होत जातो; जसें–आत्मात्म्य–आप्पणाप्प–आपणापे.

पान १४ ओळ, "जो जन्म क्षेपी तेयासि"–या ठिकाणीं संबंधींवाक्य आलें आहे. ( सन११२९ 'अभिलाषितार्थचिंतामणि, 'जेणें रसातल. उगु मत्स्यरुपें वेद आणियले मनुशिवक वाणियलें तौ संसारसागर मोहंतरावो

नारायणु ।; सन ११८७ परळ शिलालेख, ' अथ तु कोणु हुवि ए शासन लोपी तेया ।; सन १२०८ खानदेश पाटण शिलालेख, 'इयां पाटणीं जें केणे उघटे तेहाचा असिआउं जो राउला होता ग्राहकापासी तो मढा दीन्हला । ब्राह्मणां जें विकतेयापासीं ब्रह्मोत्तर तें ब्राह्मणी दिन्हलें । "] "यापरि योग्य होए तयासि परमेश्वरु वीशेषज्ञानदान करीति (पान १२) 'जैसी असिली तैसी सृष्टि रचे " (पान ७); "तेणें नाहीं लाविलें ते तयाचेनि न फिटे" ( पान १२ ); जें जेतुलेनि क्षाळावें तें तेतुलेनि क्षाळी ( पान ११ ).

वरील वाक्यावरून संबंधींरचना करतांना जो, जें इत्यादि शब्द कधीं कधीं योजीत असत व कधीं योजीत नसत असा विकल्प दिसून येतो. या बाबतींत शिलालेखांचा दाखला स्पष्ट आहे.

' क्षेपी ' व ' देति ' या वर्तमानकाळच्या रूपांवरून ' 'भविष्यकाळचा अर्थ सूचित केलेला आहे; तरी त्याचा अर्थ भविष्यकाळची रूपें ' लीलाचरित्रांत ' नाहींत असा मात्र समजूं नये.



# परिशिष्ट--अ.

## "लीलाचरित्रां"तील उतारा.

[ 'पूर्वी' प्रकरणावरील प्रास्ताविक टीप वाचल्यानंतर हा उतारा वाचून पहावा ]

म्हाइंभटां उदग्रहणीकापूर्वक ईश्वरप्रतीति करणें ।। म्हाइंभटोबासीं पांच दरुसणें वाचिलीं: सावें दरुशन तें प्रभाकर: तें ए देसी वाचूं न ए: मग: तें तेलंग देसीं वाचुनि आले: आलेयां उपरि गांविं गणपति आपयोसीं भेटि जाली: उघाणी जाली: मग म्हाइंभटिं भणितले: उभए गंगातटाकीं अळमाळ पानरट धरु जाणेति गणपति आपयो: •मग गणपति आपथो भणितलें: म्हाइंभटो तुमचेया वाचिलेयाचे फळ तै होए जै श्रीचक्रधर गोसावियां दरुशन होए । ते काइ वीद्वांस: ना माहात्मे । कांहीं संस्कृत जाणति: नाः संस्कृत जाणति कीं नेणति हे नेणो: ते मऱ्हाटीं तवं अनावर बोलत असेति । तरि काइ मज म्हाइंयासीं बोलती: ते मऱ्हाटी बोलती तरि मीं संस्कृते बोलैन: हो कां तुम्ही तयाचेया दर्शना जाल: तेह् वेळि माते घेउनि जा: बोलावा । मग एकु दी गणपति आपयो गोसावियाचेया दर्शना नीगाले म्हणौनि म्हाइंभटानें बोलाविलें: दोघै नीगाले । मग म्हाइंभट वाटे अवघीं स्थळे मनन करूं लागले । ते ऐसे बोलती तर मीं ऐसा आक्षेपु करिन: मग दोघै भामाठाणासि आले । गणपति आपयोसि गांवामध्यें कार्यें होतें म्हणौनि ते गांवामध्ये रीगाले: तवं पींपळे वामन भट्ट गोसावीयाचेया दर्शना जात होते: गणपति आपयें पुसिलें: वामनभट्टो के जात असा । ना मी गोसावीयाचेया दरुसना जात असे । हो कां: तरि म्हाइंभट्टातें घेउनि जा । ना: हो कां: मग दोघै गोसावीयाचेया दर्शना नीगाले । गोसावी उत्तरें भीतरिंला वोटेयावरि आसन असे: पूर्वाभिमुख । गोसावीयाचा श्रीकंठीं गळदंडा: श्रीमुखीं तांबोळ: भालप्रदेशीं चंदनाचा आडा: ऐसे देखिले । पींपळे वामनभट्टीं गोसाविया दंडवतें घातलीं: श्रीचरणां लागले । म्हाइंभटीं काया प्रणित केलें । मग दोघै गोसाविया जवळि बैसले । म्हाइंभटीं गोसावियातें देखिलें । आन मागिली अवघेंचि वीसरले । नावेक वामनभट्ट बैसले होते:

मग गोसाविया दंडवत घालुनि नीगाले । म्हाइंभट्टो चाला नाः ते उगेचि । मग सर्वज्ञें भणितलें: तुम्ही तव चालाः यां असों आवडेल तव असतिः मग एतिः मग पींपळे वामन भट्ट नीगाले मग गोसावीया म्हाइंभट्टातें पुसिलें: एथौनि आत्यंतिक संसृती छेदु होएः ऐसी कांहीं प्रतीति आति । म्हाइं. भट्टीं म्हणितलें: आतिः तरि कोणें कामें ना राइजेः तवं आउसें म्हणितलें: हा बाबावरि नाहीं तेचि बोलत असे म्हणोनि घागरा बांधों आदरिला । ( ही एक प्राचीन काळची शिवी आहे; " तुझा मढा बांधे घागरा जो जाए वाजति टुणटुण करिति मसणव्हेरी " ) मग गोसावी करें श्रीमुखे श्रीमुकुटे म्हणितलें: बाईः राहाः जीवांसि अनंतां जन्माचे खते बैसले असेतिः ते सहसा काइसेन फीटति । सर्वज्ञें भणितलें: कैसी आतिः म्हाइंभट्टीं भणितलें: कर्म कीजेः कर्मातव सुध अंतःकरण होएः सुधे अंतःकरणीं वैराग्य उपजेः वैराग्यांतव ज्ञान उपजेः ज्ञानोदये मोक्षः मग पींडापासीं भेटी । मग यावरि सर्वज्ञें भणितलेः नीत्यनीमित्यकें कर्मे तीयें प्रतिदीनीचेया प्रतिवाया परिहारां गेलींः कामिकें तीयें फळां गेलींः एकी वासनाः नीमीत्यकें कर्मे तीयें प्रतिदीनीचेया परिहारां गेलीः कामीके तीये फळां गेलीः मां कें असे कर्मः मां काइसेन सुध अंतःकरण होइलः मां कें असे वैराग्यः मां काइसेन ज्ञान उपजैलः मा ज्ञानोदयें कें असे मोक्षः एकी क्रीएचा ठाइ दोनि फळें असेतिः हें अवघेंचि लटकें । मग सर्वज्ञें भणितलें: अविद्या युक्ता जीवा स्वता ज्ञान संभवे कां न संभवे । आन कां संभवे । यावरि उधाणीं प्रवर्तली । मग म्हाइंभट्टीं भणितलें: गणपति आपयो भणितलें होतें: ते मऱ्हाटी अनावर बोलताति ते हे । आतां संस्कृतें उपन्यास करूं । मग मांहिंभट्टी सहसंस्कृतें उपन्यास केला । गोसावी अवलीळा सहसंस्कृत बोलों आदरिलें । मग गोसावी जे प्रयोग बोलेति ते तया सृत ( श्रुत ) हीं नाहीं । ऐसे घडिया चारि सहसंस्कृतें उधाणी ज़ालीः मग सहसंस्कृतें नीरोत्तर केलें । मग म्हाइंभट्ट उगेचि राहिलेः मग गोसावियाचि श्रीमुख केलेंः सर्वज्ञें भणितलें: सृष्टीमध्यें जीउ जेतुलेंही करी तेतुलेंही काइसेनही मुंचेना एके...। माइंभटीं भणितलें: तें एक सृष्टी अंतरवृत्यें होएः आन जीवाचे करणीए होएः तरि तेणें कां मुंचावेंः आणि एरें कां न मुंचावेंः सर्वज्ञें भणितलें तो जीवाचा स्वभावोः आन म्हाइंभट परिसौनि म्हणितलें:

जी जीः एक तें कवण। सर्वज्ञें भणितलेंः ईश्वरदास्य। म्हाइंभटिं भणितलें। जी जीः नीराकारा नीर्त्वेवा ईश्वराचें दास्य कैसेंनि घडे। सर्वज्ञें भणितलेंः नीरोकार नीर्त्वेउं असे तो सावेउ साकारु होएः अवतरेः अवतरौनि आपुलें दास्य देः तें दास्यमोचक॥ जी जी तो कोण। जैसे द्वापरीं श्रीकृष्णचक्रव्रतिचें दास्य घडे तै हा जीउ संसारापासौनि मुंचे। तयासि म्हाइंभट्टीं संका केलीः जी जीः तें युगचि गेलें। तेणें अवतारें बीजें केलें। सर्वज्ञें भणितलेंः जैसे मातापुरी श्रीदत्तात्रए प्रभुचें दास्य घडे तै जीव संसारापासौनि मुचेः तरि ते अदृश्य। तया दर्शन देणें नाहीं। सर्वजें भणितलेंः जैसे द्वारावतीए श्रीदेवराउळाचें दास्य घडेः तर हा जीऊ संसारापासौनि मुंचे। तयासि आशंका केली। तें अविद्यमान। सर्वज्ञें भणितलेंः जैसे आजि कालींचा मानी रीधौरीधौरी श्रीगुंडम राउळाचें दास्य घडे तै हा जीऊ संसारापासौनि मुंचे। प्रत्यासि आले पर सविसेख वुझतीचि नाः एकी वासना। सर्वज्ञें भणितलेंः जैसे परमेश्वरपुरीं श्री प्रभु गोसावी। मग म्हाइंभटीं भणितलेंः जी जी संनिधान तें कैसें। सर्वज्ञें भणितलेंः तें ऐसें म्हणौनि गोसावी आपणयाकडे श्रीकरें दाखविलें। शोध। सर्वज्ञें भणितलेंः जीवासि बोध आणि बोधशक्ति १॥ एथ गोसावी हस्तीचा दृष्टांत नीरुपीलाः मग म्हाइंभटां बोध जालाः मग म्हाइंभटासि गोसावीयावरि हा ईश्वरु ऐसी प्रतीति जाली मग उठलेंः दंडवतें घातलींः श्रीचरणां लागलेंः मग वरुसा एका श्रीप्रभुचां ठाइं अनुसरले॥ १११॥ उत्तरार्ध॥



## परिशिष्ट—ब.

# सूत्रस्वरूप लक्षणें: भीष्माचार्यकृत "पंचवार्तिक"

## आणि

# " लक्षणरत्नाकर " यांतील उतारे

१ " अल्पाक्षरें असंदिग्धें सारवंते विश्वतोमुखें सार्थकें निर्दोषें जेही प्रयोगें अर्थज्ञानु सूत्रिजे ( मुद्रिजे ) तेआं प्रयोगातें " सूत्र " ऐसे भणिजे। थोडीं अक्षरें असौनि बहुतां अर्थीते निर्वची ते "अल्पाक्षर"। एकुचि शब्दु अनेकार्थीं प्रवर्तला असतां उपयोग्य अर्थाचें प्रकाशक तें " असंदिग्ध "। असार सिद्धांताचिया व्यावृत्तीं सार सिद्धांत जेथ वर्ते ते " सारवत्। एकचि सूत्र अनेका व्याख्यानातें पावे ते " विश्वतोमुख "। अपर शास्त्रसिद्धांतेकरुनि स्वसिद्धांतु दूषिला नवचे तें " अस्तोभ "। अतिव्याप्ति अव्याप्ति असंभव दोष जेथ न पवेति तें " अनवद्य "—ऐसें सूत्राचे संकेतलक्षण जाणिजे। मग सूत्रबंधभेदलक्षण जाणिजे। मग सूत्रबंधभेदस्वरुपलक्षण जाणिजे।

२ तेआ सूत्राचे चारी भेद: वचन: वाक्य: प्रकरण: महावाक्य भाष्यकारें भणितलें:। एकें दो शब्दें आचाराविचाराचा निर्वच कीजे ते "वचन"बोलिजे। दो चौ वचनांचा समुच्चयो तें "वाक्य" बोलिजे। सातां पांचां वाक्यांचा मेळावा तें "प्रकरण" बोलिजे। सातां पांचां प्रकरणांचा बांधा तें महावाक्य बोलिजे। शब्दें भणजे पदें ॥ वचनप्रत्यभिज्ञा पदओळखी वांचौनि न होएचि: भणौनि आधीं पदओळखी होआवीचि लागे। एकचि क्रियापद समग्रां पदांतें व्यापी तें "केवळ" वाक्य। बहुतिए क्रियापदें आपुलालेआं पदांतें व्यापिती तें संयुक्त वाक्य। एकें संयुक्त वाक्यें दोनि प्रयोगां मिळौनि असति कां तीनि प्रयोगां मिळौनि असति। एवं उत्तरोत्तरीं वृद्धिक्रमु जाणिजे। जिये सूत्रीं क्रियापद नसे तेथ '.असे' आतिः असतिः होएः होतातिः या क्रियापदांचें अध्याहार जाणिजे। वाक्यें वचनवत्प्रयोगां कां वाक्यवत्प्रयोगां कां वचन वाक्यवत्प्रयोगां मिळौनि असति। जियें सूत्री पदाची न्यूनता भासे तेथ भीत-

रींचिआ भीतरीं पूर्वपदानुवृत्ति कीजे आन अध्याहार कीजे। ऐसेयापरि चतुर्विध सूत्रीं पूर्वपदानुवृत्ति आन अध्याहार कीजे।

चौ पदांपासौनि जंव अठरा पदें तंव वाक्याचे भेदः एका पदाचे वचन वर्जौनि मग वचनाचे भेद तेही प्रकरणसूत्रीं वाक्यवत् जाणावीं। या भेदांमध्यें भलतिए वाक्यांचा मेळावा तें " प्रकरण " सूत्र। तीनि प्रकरणापासौनि बारा प्रकरणांचें तें " महावाक्य "। या वरौतें सूत्र नव्हे। ते निरोपणाचीं मोकळीक जाणिजे। सातां पांचां प्रकरणांचा बांधा तेही " महावाक्य " जाणावें। तथा सात पांच नामग्रहणे जिए वाक्यीं असति ते " महावाक्य " बोलिजे। आवघेआ शास्त्राचा आवाका यातें " पेंडी " बोलिजे। नित्यानित्यवस्तुविवेकें करौनि अमुके मोचके आन अमुके अमोचके ऐसा शास्त्रनिर्धारित दो थोवेआचा समुच्चयो जेणें यथार्थ उमटे तो " आवाका " बोलिजे। अवघिया निरूपणाचा आवाका यातेही तथा अवघेया प्रकरणाचा आवाका यातेही " पेंडी " बोलिजे।

३ आतां " सूत्रप्रकृति " सांगतां असीजे। तरी सूत्रप्रकृति भणजे कांईः नाः सूत्ररूपत्वे रचनासाम्य असतांहि सूत्रांसि परस्परे जी विलक्षणता ती सूत्रांची प्रकृति जाणिजे। ऐसी विलक्षणता आति भणौनि सूत्रप्रकृतीचे ज्ञान होआवेंचि लागे। सूत्रप्रकृति दशधाः संज्ञाः परिभाषाः नियमः अतिदेशः अपवादः विभाषा निपातः प्रतिषेधः अधिकार। ऐसे सूत्राचे दहा प्रकार असति। साजात्यां वैजात्यां कां मिश्रां अनेकां वस्तूचीं नामें एकत्र जेथें आळविजेति तें "संज्ञासूत्र" जाणिजे। शब्दाचे आर्थाचें ज्ञापकसूत्र तें "परिभाषासूत्र" बोलिजे ' लक्षण 'सूत्रें ही शब्दार्थांचे ज्ञापक होताति तथा ' संख्या ' ज्ञापकसूत्रेंही होतातिः भणौनि तियेंहीं ' परिभाषा ' शब्दें आळविजे। विधिरूपें कां निषेधरूपें जिये आचारसूत्रें तियें " विधि " सूत्रें भणिजे। कर्तव्याचीं ज्ञापके क्रियापदें जेथ असति तियें विधिरूपें सूत्रे जाणिजेति। जेथ निषेधार्थांचीं ज्ञापकें क्रियापदें असति तियें " निषेध "रूपें सूत्रें जाणिजेति। जियें विचारसूत्रीं क्रियापदें करौनि वस्तुनियमः वस्तुस्वरूपनियम तथा वस्तुकारणनियम कीजे तियें " नियम " सूत्रें भणिजेति। जेथ दृष्टांत प्रधानु असे

तें “ अतिदेश ” सूत्र भणिजे । एवमादि जेतुले हि चाकारान्त दृष्टांतसूत्रें तिये सर्वहि ‘ अतिदेश ’ सूत्रें जाणावीं । एकाची निंदा एकाची प्रशंसा जियें सूत्रीं असे तें “ अपवाद ” सूत्र बोलिजे । एवमादि पंचमी विभक्तीचेनि योगें अपवाद सूत्रें जाणिजेति । जेथ अंतीं संबोधन द्वितीया तृतीया चतुर्थी पंचमी षष्ठी सप्तमी कां अव्यये असति तिये “ विभाषा ” सूत्रे जाणिजेति । जेआ वांचोनि जें अनुपपन्न आति तेआची अनुपपत्ति वारावेआ जेथ पदाचा कां वाक्याचा निपतन होत असे तेआंते “ निपात ” सूत्र बोलिजे । तेंचि निपात कर्तृपद असौनि क्रियापदाचा अभावीं कां दृष्टांत असौनि दार्ष्टी-तिकाचा अभावीं जाणिजे । आचारसूत्र व्यतिरिक्त नाहीं: “नव्हे” एवमादिक निषेधज्ञापक क्रियापदे जेथ असति तिये “प्रतिषेध” सूत्रे बोलिजेति । जिये प्रथमसूत्रीचें अधिकृत पद द्वितीय सूत्रीचें अर्थालागी संबंधिजे तें “अधिकार” सूत्र बोलिजे ।

परमेश्वरे श्रीचक्रधरें द्वादशप्रकरणसूत्रे तथा इतरेहि प्रकरणवशें वेगळालीं निरोपिलीं असति । तेआमाजि एकाचेआं अंती क्रियापदें असतिः कवणांचेया अंती सप्तविभक्त्यंत पदे असतिः कवणांचेया अंतीं अव्यये असति । ऐसी विविध सूत्रप्रकृति असे । इये त्रिविधा सूत्रप्रकृतीमाजी दशविध सूत्रप्रकृ-तिभेदे सकळेंही सिद्धांतसूत्रें जाणावीं । मग तेआमाजी विधिसूत्रें प्रतिषेध-सूत्रे नियमसूत्रें सर्वत्र क्रियापदे करौनि युक्त असति । परिभाषा सूत्रांचिआ तथा निपातसूत्रांचिआ अंती क्वचित् क्रियापद असे आन क्वचित् प्रथमा असे । संज्ञा सूत्रांचिआ तथा अपवाद सूत्रांचिआ अंती सर्वत्र प्रथमा असे । अतिदेश सूत्रांचिआ अंती सर्वत्र षष्ठी असे, विभाषा सूत्रांचिआ अंतीं क्वचित् अव्यये आन क्वचित् संबोधनीं एकवचनः आन प्रथमा वरजौनि सकळीं विभक्तिअ असति । जेथ संबोधनीं बहुवचन दिसत असे तें गौरववाचक जाणिजे ।

४ आतां “सूत्रकारक” निरौपिजताए । सूत्रांचेआ अर्थांचा निर्णयो कारका वांचौनि न होवेचि । भणौनि सूत्रकारकाचें ज्ञान होआवेंचि लागे । केवीः जे श्रीनागदेवाचार्ये भणितलें: अगा केशवदेया ! हें शास्त्रवचनरुप परमेश्वरू । तें वचन जै अन्यथा वाखाणिजे तरी तेआ वचनरूपा परमेश्वराचा वाखाणित

पतित होए। तेणें पुरुषें तो परमेश्वरू दुखविला गा। यातव व्याकरणज्ञानें करौनि सूत्रकाराचा निर्धारू यथातथ्य जाणिजे। तै वचनार्थांचा यथार्थ अर्थ उमटे: हें जैं नसे तैं नुमटेचि।

निर्णयो त्रिविध।, शब्दाख्य: संप्रदायाख्य: रहस्याख्य। शब्दाख्य निर्णयो व्याकरणें अभिधानें आन अलंकारशास्त्रें जाणिजे। संप्रदायाख्य निर्णयो अधिकरणमुखे श्रवण: मनन: निदिध्यासनें करौनि जाणिजे। रहस्याख्य निर्णयो सद्गुरुमुखें परसिद्धान्तसूत्रे जाणिजे।

५ आतां "सूत्रव्याख्यानलक्षण" सांगतां असीजे। जेथ पदच्छेद: पदार्थोक्ति: विग्रहो: वाक्ययोजना आक्षेप: का समाधान इये सा प्रकारें सूत्रांचा अर्थ प्रकाशित होत असे तेआतें सूत्रव्याख्यान भणिजे। जेथ केवळ: संयुक्त: अव्यय: क्रिया या चौ पदाचा विभागु कीजे आन विभक्तीचाही निर्देश कीजे तेआतें "पदच्छेद" बोलिजे। जेथ प्रत्येक पदाचेआ अर्थांचियें अवबोधकें जियें वाक्यें तेआंतें "पदार्थोक्ति" बोलिजे। कार्यजिज्ञासा एवमादीक शब्दांचेआ अर्थांचिये अवबोधके जियें वाक्ये तेआंतें "विग्रह" भणिजे। वाक्य योजनेचे दोनि प्रकार असति। सूत्रसंबंधकाळी आदौ कर्ता मग कर्म मग क्रिया मग तेआचीं विशेषणें आन करणादि उपपदे आन यथोचित स्थानीं अव्ययें मेळविजे यातें "खंडान्वयो" भणिजे। सूत्रसंबंधकाळी आदौ विशेषणयुक्त कर्ता मग विशेषणयुक्त करणादि उपपदें मग विशेषणयुक्तचि कर्म मग विशेषणयुक्तचि क्रिया आन यथोचित स्थानीं अव्ययें मेळविजे तेयातें "दंडान्वयो" भणिजे। सूत्रीं तत्तत्पदाचें प्रयोजन पूसिजे याते "आक्षेप" भणिजे। सूत्रीं तत्पदाचें प्रयोजन दाखविजे यातें "समाधान" बोलिजे। सूत्रव्याख्यानकाळीं आदौ पदच्छेद मग विग्रहो मग वाक्ययोजना मग पदार्थोक्ति मग आक्षेप मग समाधान कीजे।

६ आतां "सूत्रस्वरूपलक्षण" सांगिजताए। जेथ बत्तीस लक्षणें करौनी सूत्रांचे भाव प्रकाशित होत असे तेंआतें "सूत्रस्वरुप" ऐसें भणिजे। फलश्रुतिज्ञापक वाक्यातें "प्रतिज्ञासूत्र" बोलिजे। जेणें दृष्टादृष्ट अर्थांचें

अनुभवज्ञान होए तेआते " प्रमाणसूत्र " भणिजे। तेचि प्रमाण आप्तवाक्य जाणिजे: आप्तवाक्य ते श्रुति। जेथें दृष्टे करौनि अदृष्टार्थ बुझाविजे तेआतें " दृष्टांतसूत्र " बोलिजे। संतासंत क्रियेचे फलवाक्य ते " उपपत्तिसूत्र " भणिजे। यथार्थज्ञाने करौनि सामान्य पदार्थी विशेष बुद्धीचा तिरस्कारु जिएं सूत्री असें तेआते " व्यावृत्तिसूत्र " भणिजे। पदार्थनिर्वचनीं परमेश्वर-शास्त्रे करौनि जेथ सार निवडीजे तेआते " विषयप्रदानसूत्र " भणिजे। आचारीं अनेक विधि ( विधिरूप विधि आन निषेधरूप विधी ) प्राप्त जाहलेया कवण कीजे आन कवण न कीजे या विभागाचा जेथ विशेषत्वे ज्ञान होए तेआते " विशेषप्रबोधकसूत्र " भणिजे। जेआ सूत्रांतरेंकरौनि अर्थमात्राचे उच्छेदन कीजे तेआतें "उत्सर्गसूत्र" बोलिजे। उत्सर्गाचा निंदेकरौनि निषेध कीजे तो अपवाद। अपवादे व्याप्त ते "अपवादसूत्र"। कवणे काळीं जो अर्थ सेव्य नव्हे तेआचा जेथ तिरस्कारु तेआते "निषेधसूत्र" भणिजे। जिये सूत्रे करौनि अनुक्तार्थाची सिद्धि होए तेआते "न्यायसूत्र" भणिजे। कवणीं एकी काळी करणीय ते अकरणीय होए आन अकरणीय तें करणीय होए एणें परिहारें व्याप्त तें "विरोधपरिहारसूत्र" बोलिजे। शब्दाचेनि उत्कर्षे मुख्यार्थातें त्यजोनि अन्यथा करणालागी जे उक्ति उच्चारिजे तेआते "काकुसूत्रें बोलिजे। जेथ आना पदार्थासि आनें शब्दे गूढ हेतु आळविजे तेआते "कथासूत्र" भणिजे। जियें सूत्रीं जो जैसा शब्द असे तेआचा तैसाचि अर्थ जाणिजे तेआतें " भावार्थसूत्र" आणिजे। एथ शब्दानुसारी अर्थ जाणिजे। जियें सूत्री प्रसंगवशें अनेकार्थक शब्दाचा एकार्थ होत असे तेआते "प्रकरणसूत्र" भणिजे। जिये सूत्री "आति" एवमादिकें क्रियापदें करौनि वस्तु निर्धारिजे तेआतें "आस्तित्वसूत्र" भणिजे। जियें पदार्थी जो जैसा भेद असे तो तैसाचि जेथ निर्वचिजे तेआते " निर्देशसूत्र " भणिजे। जिये सूत्रीं हीनाचेआ व्यावृत्ती ऊंचाचा निर्धारु असे तेआतें " निर्णयसूत्र " भणिजे। जियें सूत्रीं एका शब्दाचे अनेकार्थ होताति तेआते " पक्ष " सूत्र भणिजे। जियें सूत्रीं परस्परवैजात्य वस्तूंचा निर्वच कीजे तेआते " प्रभेदसूत्र " भणिजे। जियें सूत्री विरोधकल्पना उदैजे

तेआतें " आशंकासूत्र " भणिजे। जियें सूत्री आक्षेप केला असे तेआतें " आक्षेप सूत्र भणिजे। जेथ कार्यांचे निरोपण असे तेआतें " कार्यसूत्र " भणिजे। नित्यानित्य पदार्थांचे असाधारणत्व जिये सूत्रीं वर्णिलें असें तेआतें " लक्षणसूत्र " भणिजे। ज्ञान–विज्ञानवंत स्वरूप जेथ वर्णिले असे तेआतें " स्वरूपसूत्र " भणिजे। जेथ कारणाचे निरोपण असे तेआते "कारणसूत्र " भणिजे। जिये फलवाक्यीं फलाचेनि आवश्यकत्त्वे विधि कल्पिजे तेआते 'हेतु' सूत्र भणिजे। मागिला सूत्राचा संबंध जेणे उपसंहारवाक्ये उद्धारिजे तेआते " संबंध " सूत्र भणिजे। होए ते होए आन नव्हे तें नव्हे ऐसा जेणें यथार्थ निश्चयो होए तेआते " प्रतीति " सूत्र भणिजे। जिये सूत्रीं विशेषणें करौनि अन्यसूत्रस्थित विशेष्य व्यापिजे तेआतें " विशेषण " सूत्र भणिजे। जेणे आपुलेया शास्त्राचा उत्कर्ष प्रतिष्ठिजे तेआतें " प्रतिष्ठा " सूत्र बोलिजे।

७ "प्रतिष्ठालक्षण:" प्रतिज्ञाप्रमाणीं परधर्मोत्कर्षज्ञानालागिं प्रतिष्ठेचें ज्ञान होआवें लागे। प्रतिष्ठा ते आचारीं विचारीं लाभे। जेणें आपुल्या शास्त्राचा उत्कर्ष प्रतिष्ठिजे ते प्रतिष्ठासूत्र। आतां प्रतिष्ठेचें दुसरे लक्षण। सर्व अपराचिया व्यावृत्ति करूनि सर्वशास्त्रविषयप्रदानचतुर श्रीनागार्जुन तेणें ईश्वरप्रसादास्तव आर्तजनास्तव चांद्रदयी ब्रह्मविद्येकरूनि प्रतिष्ठिला जो परधर्मु ते प्रतिष्ठा बोलिजे। आतां प्रतिष्ठेचें तिसरे लक्षण। समानधर्मु असतां अनेकवादभेदी प्रतिपक्ष–पराजयहेतुवाक्यी आपुलें शास्त्रज्ञान प्रतिष्ठिजे। कां आपुला क्रियाविशेषु किंचित् प्रकटवीजे। ते प्रतिष्ठा बोलिजे। ते जेथ वर्ते तें प्रतिष्ठावचन बोलिजे।

एवं बत्तीस लक्षणीं सकळशास्त्रीं पंचवार्तिकें अनुवर्तवावीं। तैंचि ब्रह्मविद्येची व्युत्पत्ति होए। एऱ्हवीं सूत्ररूप परमेश्वरु दुःखविणे घडे। भणौनि पंचवार्तिकें गुरुमुखें अभ्यासावीचि लागे तै संपूर्णत्व होए।

[ "परस्परे मथन कीजे: मग केलेया नुतन होए ॥ १ ॥ स्वोक्ती शास्त्रोक्ती लोकोक्ती या तिन्ही उक्ती परीत्येजुनि एथचिया वीत्पत्ति वीत्पन्ना होआवें ॥२॥

हे आभ्रिति ( अधृत ) शास्त्र कीं गा ॥ ३ ॥ हें होऔनि कव्हणाचें घर न रीगे । आपणचि एयाचें घर रीगीजे ॥ ४ ॥ यासि आपणपे दीजे तर हे आपणपे दे ॥ ५ ॥ घेईजे घोकीजे मग काळें करून उपयोगां जाए ॥६॥ आतांचे तव ऐसे घेपे: पाठीं आनुभवें जाणाल ॥ ७ ॥ हें वचनः हा वचनार्थः वचन जावों नेदीजे ॥ ८ ॥ काकु कक्षा भावार्थ प्रकरण जाणावें ॥ ९ ॥"
—आचारपाठ सरवळा ५४.

आर्थ तो प्रकरणवशें: प्रकरणे अर्थ विनयोजकः अर्थी दृष्टांत दीजे ।–विचार-मालिका, सरवळा २२६. ]



# सूचि

